# प्रेमध्वज.






प्रेम०:—दैवाची परीक्षा पहाण्याकरितां मला निशाणाजवळ लवकर गेलें पाहिजे. [पृष्ठ ८२

॥ श्री ॥

# प्रेमध्वज.



हें नाटक

## श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर

संगीत त्रिदंडी संन्यास,' 'संगीत सावित्री,' 'संगीत मेनका,' 'संगीत मानापमान,' 'संगीत स्वयंवर,' 'संगीत विद्याहरण,' 'संगीत द्रौपदी,' 'सवती मत्सर,' 'सत्वपरीक्षा,' 'कीचकवध,' 'बायकांचें बंड,' 'सवाई माधवराव यांचा मृत्यु,' 'कांचनगडची मोहना' या नाटकांचे कर्ते यांनीं लिहिलें.




प्रकाशक व मुद्रक

**श्री. यशवंत कृष्ण खाडिलकर.**

"श्रीदत्तात्रय प्रिंटिंग प्रेस" १३ शेणवीवाडी, खाडिलकर रोड, गिरगांव, मुंबई नंबर ४





( आवृत्ति तिसरी )





सन १९५०.





किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

इंग्रजी कादंबरीकार सर वाल्टर स्कॉट याच्या 'टॅलिस्मन' कादंबरींतील ध्वजनाशाचे कथानकाला महाराष्ट्र वाङ्मयाला साजेसें रूप या नाटकांत दिलें असून, मराठींत याच विषयावर पुस्तकरूपानें किंवा प्रयोगरूपानें आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांहून किंवा नाटकांहून या नाटकांतील हरएक प्रवेश स्वतंत्र रचनेचा लिहिलेला आहे. दोन धर्मांचे लोक धर्मयुद्धाकरितां समरभूमीवर उभे ठाकले असतांना खाजगी सुखाकरितां आपल्या पक्षाचें रणभूमीवरील निशाण स्वतःच्या हातांनीं गुपचुप मोडणें, हें मानव प्राण्याच्या हातून होऊं शकणाऱ्या अत्यंत अघोर पापांपैकीं एक पाप होय. मूळ इंग्रजी कादंबरींत हें दुष्कृत्य त्या वेळच्या युरोपखंडांतील राजकीय महत्त्वाकांक्षेच्या चढाओढीमुळें झालेलें दाखविलें असून, या नाटकांत नायिकेच्या प्राप्तीसाठीं केलें गेलेलें दाखविलें आहे. ध्वजनाशाच्या मुख्य कृतींतील हेतूंत असा मोठा फरक पडलेला असल्यामुळें सर्व पात्रांच्या चरित्रांचा ओघ—किंबहुना नाटकाच्या नांवापासून तों स्वभावपरिपोषापर्यंत सर्व रससमुच्चयाचा ओघ—बदलावा लागला आहे. प्रेमध्वज व उदेपूरची राजकन्या पद्मावती यांमधील मधुर प्रेमास मुख्य प्रवाहाचें महत्त्व या नाटकांत दिलेलें असून राजकीय महत्त्वाकांक्षेचे चढाओढीस अगदीं कनिष्ठ प्रतीच्या ओघळाचें रोडलेलें दैन्य प्राप्त झालें आहे. पद्मावतीविषयीं वाईट अभिलाष धरणाऱ्या बुद्धिसिंगाच्या कपटाचे खडकाला वळसा देऊन हा प्रेमाचा प्रवाह धीर व गंभीर गतीनें चालला असतांना उदेपूरचे राणा प्रतापसिंहाच्या संतापी स्वभावावर आदळतो; व त्याला एकदम उदात्त स्वरूप प्राप्त होतें. अकबर बादशहाच्या उदार स्वभावामुळें या स्वरूपांत विशेष भर पडली असून, विनोदी वृद्धि व क्षय, आणि दारूबाज

गरुडध्वज यांच्या हास्यकारक भाषणांनीं त्याला उठावाचा स्पष्टपणा मिळालेला आहे.

यथील ' स्टुडंट्स सोशल क्लबचे ' सेक्रेटरी रा. रा. दत्तात्रय आत्माराम फाटक, बी. ए. एल्.एल्. बी. यांनीं याच विषयावर लिहिलेल्या नाटकाचा प्रयोग सुमारें दोन वर्षांपूर्वी नाट्यसंमेलनाचे प्रसंगीं सदर क्लबनें येथें करून दाखविला. तो प्रयोग पाहिल्यावर ध्वजनाशाचे कथानकास या नाटकांतील स्वरूप देण्याचे माझे विचारांनीं पुन्हां उचल केली. सदर प्रयोग पाहण्याची व त्याची हस्तलिखित प्रत वाचून त्यासंबंधाची चर्चा करण्याची संधि मला रा. फाटक यांनीं दिली, व हें नाटक लिहीत असतांना हरएक प्रकारची मदत केली; या त्यांच्या उपकाराचा आभारपूर्वक उल्लेख येथें करणें जरूर आहे. संगीत नाटकाचे उद्योगांत गुंतल्यामुळें सर्व नाटक स्वतः न लिहितां प्रेमविषयक कांहीं प्रवेश लिहून नाटकाची इतर उभारणी करण्याचें ओझें दुसऱ्याचे शिरावर ठेवण्याचा प्रथम संकल्प असतांना हरएक प्रवेश मजकडून लिहवून घेण्याचे कामीं दाखविलेल्या निष्ठेबद्दल, पुस्तकांत चित्रें घालण्याकरितां नटांचे त्या त्या प्रसंगाचे फोटो दिल्याबद्दल, आणि नाटक बसवीत असतांना कवित्वाच्या दृष्टीनें व रंगभूमीवर त्याचे प्रयोग झाल्यानंतर प्रयोगाच्या दृष्टीनें उपयुक्त सूचना केल्याबद्दल ' महाराष्ट्र नाटक मंडळी ' चा मी फार फार आभारी आहें.

पुणें, तारीख ४
माहे ऑगस्ट सन १९११.

ग्रंथकर्ता.

॥ श्री ॥

# प्रेमध्वज.



## अंक पहिला.



### प्रवेश पहिला



( नदीच्या कांठीं अकबर नमाज पढत आहे, असा देखावा. बुद्धिसिंग व त्याचे दोन नोकर प्रवेश करितात. )

बुद्धि०:—काय म्हणालांत, पद्मावती आजच भवानीच्या दर्शनाला आली आहे ?

प० नो०:—होय; महाराणा प्रतापसिंह यांच्या राणीवशांतली सर्व मंडळी साधु अमरनाथ यांच्या देवीच्या दर्शनाला आली आहे. आजची रात्र देवीच्या सन्निध काढून उद्ईक सकाळीं सर्व छावणीकडे परतणार आहेत.

बुद्धि०:—आपल्याला आतांच या जंगलांत सायंकाळ झाली; मला वाटतें, आजची रात्र आम्हांलाहि अमरनाथ साधूंच्या जवळ काढावी लागणार. ( स्वगत ) भवानीनें पद्मावतीला व मला या रात्रीं एका ठिकाणीं आणलें आहे, हें माझ्या पुढच्या बेताला अनुकूलच आहे. कारण आजचे माझे बेत तडीला गेले तर पद्मावतीला आपलें सर्व आयुष्य, तिची इच्छा असो वा नसो, माझ्या मंदिरांत काढणें भाग पडेल. ( उघड ) कायरे ! पद्मावतीबरोबर एखादा मोठा सरदार आला आहे का ?—काय, मी काय विचारतों आहें ! पद्मावतीसंबंधाच्या माझ्या विचारांना असा अपशकुन

करतां ? काय, पाहतां आहां काय ? ( पाहून ) असें ! यांच्या चेहेऱ्या-वरून हा कोणी मोठा सरदार असावा असें दिसतें. हा नमाज पढतो आहे. हें पहा, पाय न वाजवतां त्याच्या मागच्या बाजूला जा, आणि वाघानें जशी अवचित आपल्या शिकारीवर झडप घालावी तशी त्यानें शेजारीं ठेवलेल्या तरवारीवर झडप घाला; म्हणजे त्याला गिरफदार करा-यला फारसा वेळ लागणार नाहीं. ( बुद्धिसिंगाचे नोकर तरवार हिसकावून अकबराला पकडतात. ) ( स्वगत ) या धर्मयुद्धांत इतर रजपूत राजांबरोबर मीहि लढाईला आलों आहें, पण संग्रामदेवता प्रसन्न करायचा प्रसंग आजपर्यंत माझ्यावर कधींच आला नाहीं; यामुळें जोधपूर–उदेपूरचे सर-दार 'भित्रा' म्हणून मागें मला नांवें ठेवितात. पण बेटयांनों, पहा दैव कसें माझ्या मसलती स्वभावाला अनुकूल आहे तें ! एक मोठा अमीर अनायासानें मला कैद करायला मिळाला. दैव जर असेंच मला अनुकूल झालें तर मजकडे पाहून नाक मुरडणाऱ्या त्या पद्मावतीलाहि प्रसंगाप्रसं-गानें, मसलतीमसलतीनें, माझ्या जनानखान्याचा रस्ता मी दाखविल्या-शिवाय रहाणार नाहीं. ( नोकर अकबराला घेऊन जवळ येतात. ) आपण मोंगल छावणींतील कोणी मोठे अमीर दिसतां. या वेळीं तुम्ही राजा बुद्धिसिंगाचे कैदी आहां. अकबर बादशहाकडून आपणांस सोडून देण्या-विषयीं लिहून येईपर्यंत दोन चार दिवस आपणांस आमच्या छावणींत काढावे लागतील. आपला दर्जा, आपलें नांव आम्हांला समजेल तर आपल्या योग्यतेनुरूप आपली बरदास्त ठेवतां येईल.

**अक०**:—मोंगलांच्या छावणींत माझा हुद्दा फार मोठा आहे. पण राजेसाहेब, परमेश्वराची प्रार्थना करीत असतांना अवचित माझी तलवार काढून घेऊन मला कैद करणें, हें रजपुतांच्या शौर्याला योग्य नाहीं. मी कोण आणि माझा हुद्दा काय, हें मी आपल्याला कळवीन, पण प्रथम ती

माझी तलवार मला द्या; तुम्ही तिघेहि माझ्याशीं लढा; तुमच्या तलवारीनें माझ्या अंगावर जखमा करा; आणि नंतर मला कैद करा. सांप्रत हिंदु-मुसलमानांमधील चाललेल्या युद्धाला तुम्ही धर्मयुद्ध म्हणतां, नाहीं ? धर्मयुद्ध या नांवाला साजेशी कृती करा, एवढेंच माझें म्हणणें आहे.

बुद्धि०:—धर्मयुद्ध ! अरे बाबा, हें धर्माकरितां युद्ध आहे, तूं म्हणतोस तसलें धर्मयुद्ध नव्हे हें ! [ प्रेमध्वज प्रवेश करतो.

**प्रेमध्वज**:०—हा म्हणतो तसलेंच हें धर्मयुद्ध आहे. अधर्माची कोण-चीहि वागणूक धर्मयुद्धांत रजपूत पसंत करणार नाहींत. महाराणा प्रताप-सिंह यांची तर आज्ञा सर्वांना अशी आहे कीं, कपटानें किंवा विश्वासघा-तानें शत्रूच्या एका केसालाहि रजपूत वीरानें धक्का लावूं नये. बुद्धिसिंगजी, उदेपूरच्या छावणींतला मी यःकिंचित् सरदार आहें; आपण राजे आहांत; असें करा, तसें करा, असें आपल्याला सांगण्याचा मला अधिकार नाहीं. तथापि महाराजांच्या हुकमाचा ताबेदार म्हणून मी आपणांस असें सांगतों कीं, याच्याशीं लढल्याशिवाय याला कैद करण्याचा अकत्यार तुम्हांला बिल-कूल नाहीं.

**अक**०:—तुम्ही चौघे मिळून लढा; तुम्हां चौघांशींहि झुंजण्याला मी एकटा तयार आहें.

**बुद्धि**०:—ज्याच्या ओंठावरचा जार अद्याप वाळलेला नाहीं, अशा एखाद्या कोंवळ्या तरुणानें मला धर्म शिकविण्याचा आंव घालावा काय ? प्रेमध्वजा, तुझा हा धर्म उदेपूरच्या छावणींत चालेल. इतर रजपूत राजांना धर्मोपदेश करण्याचा आंव घातलास तर त्याचा परिणाम फार वाईट होईल. अरे, न्या त्याला, आपल्या गोटाकडे घेऊन चला.

**प्रेम**०:—खबरदार त्याला येथून हलवाल तर.—सांगा, बुद्धिसिंगजी सांगा, काय परिणाम होणार असेल तो सांगा. ही माझी समशेर तो परि-

णाम येथेंच ऐकण्यास तयार आहे.—थांबा मी तुम्हांला त्याला नेऊं देणार नाहीं.—त्याच्याशीं लढण्याचें तुम्हीं टाळलेंत खरें, पण प्रथम माझ्याशीं लढावें लागेल आणि नंतर त्याला येथून न्यायला तुम्हांला सांपडेल. या, असें पुढें या. बुद्धिसिंगजी, काढा तलवार बाहेर काढा.

बुद्धि०:—शाबास, प्रेमध्वजा शाबास. महाराण्याची आज्ञा मानणारा तुझ्यासारखा एकनिष्ठ सेवक महाराण्याला मिळाला हें त्यांचें मोठें भाग्य तर खरेंच, पण निष्कपट वर्तनावर तूं या वेळीं दाखविलेल्या भक्तीमुळें शत्रूच्याहि दृष्टीनें आम्ही सर्व रजपूत यावेळीं धन्य ठरलों आहों. अरे द्या, त्याला सोडून द्या. ( स्वगत ) प्रेमध्वजा, माझ्या बेताआड येण्याच्या या तुझ्या धाडसाबद्दल तुला प्रायश्चित्त घ्यावें लागेल. द्वंद्वयुद्धाची तुझ्या इतकी मला हांस नाहीं, तेव्हां मसलतीच्या जोरावरच आतांची वेळ मला मारून नेली पाहिजे. ( उघड ) तुम्ही अमीर असां, किंवा दुसरे कोणीहि मोठे गृहस्थ असां, या वेळीं तुम्ही आमच्या या प्रेमध्वजाचे कैदी आहां. कैदी झाल्यावर लढायचें किंवा कैदी व्हावयाच्या पूर्वी लढावयाचें, हें शास्त्र—हा धर्म—तुमचा तुम्हीं पाहून घ्या. आम्ही येतों आतां. ( जातांना स्वगत ) प्रेमध्वजा, माझ्या बुद्धीला डिवचणें तुला जितकें गमतीचें वाटतें तितकें तें गमतीचें नाहीं. [ बुद्धिसिंग व त्याचे लोक जातात. ]

अक०:—रजपूत छावणींतल्या प्रेमध्वज नांवाच्या सरदाराविषयीं बऱ्याच गोष्टी माझ्या कानावर आल्या आहेत. ते प्रेमध्वज आपणच ना ?

प्रेम०:—होय, तोच मी प्रेमध्वज.

अक०:—मला आपल्याविषयीं बरीच माहिती विचारावयाची आहे.

प्रेम०:—ती माहिती मागाहून सांगेन. पण असें पहा, तुम्ही मुसलमान आहां आणि मी रजपूत आहें. या धर्मयुद्धाकरितां आलेल्या इतर रजपुतांनीं तुम्हांला कैद केलें. विश्वासघातानें कैद केलें असल्यानें तेवढ्या-

पुरतें मीं तुम्हांला सोडवलें. तुम्ही परमेश्वराची प्रार्थना करण्याकरितां गुंतलां होतां, आणि अशा वेळीं सर्व मोंगल सैन्यांतलीं सूत्रें हालविणारा अकबरशहा जरी माझ्या तावडींत सांपडला असता तरी मीं त्याला कैद केलें नसतें. कारण तुम्ही धर्माचें आचरण करीत होतां. जा, तुमचे नमाज पढणें अर्धे राहिलें असलें तर तें पुरतें करून घ्या; आणि नंतर ती तलवार तुम्ही म्यानांतून बाहेर काढा. तुम्ही बुद्धिसिंगाला मघाशीं म्हणत होतां त्याप्रमाणें रजपूत वीराचे आणि तुमचे दोन हात झालेच पाहिजेत.

अक०:—माझें नमाज पढणें संपलें आहे. आपल्या इच्छेप्रमाणें ही तलवार मी म्यानांतून बाहेर काढीत आहे. पण ज्या परमेश्वराची मीं इतका वेळ प्रार्थना केली त्या परमेश्वराला साक्षी ठेवून मी आपणांस सांगतों, कीं ही तलवार मी मोठ्या नाखुषीनें बाहेर काढीत आहें.

प्रेम०:—अमीरसाहेब, लढाई करण्याकरितां एकदां रणांगणावर उभें राहिलें म्हणजे स्वतःची राजी किंवा नाराजी याचा विचार करणें चांगलें नाहीं. [ दोघे लढूं लागतात.

अक०:—( प्रेमध्वजाचा वार चुकवून ) तुम्ही रजपूत युद्धकलाचतुर, पण आम्हीं मोंगलहि अशाच चपलतेनें— [ वार करतो.

प्रेम०:—खरा वीर ! खरा शूर ! एक वार चुकविलास, पण संभाळ, हा घे दुसरा — [ वार करतो.

अक०:—( पुन्हां चुकवून ) खरा लढवय्या ! याच्या तलवारीचे हात पहात असतांना स्वतः तलवार चालविण्याचें भानही नाहींसें होतें ! वा रे वा ! खरा रजपूत आहे ! खरोखर तुमची रजपुतांची जात उपजतच शूरांची–लढवय्यांची–यांत संशय नाहीं. मला वाटतें, बस्स झालें इतकें लढणें. आपण दोघेहि जरी कित्येक प्रहर एकमेकांशीं लढत राहिलों तरी कोणी कोणालाच हार जाणार नाहीं, हें एवढ्यावरून सिद्ध नाहीं का होत ? सरदार साहेब, आपली इच्छा असली तर अखेरपर्यंत लढण्यास मी नाकबूल नाहीं,

पण मला वाटतें बरोबरी समजून हें द्वंद्वयुद्ध आतां आपण येथेंच थांबवावें.

**प्रेम०:**—तुम्हीं खरे वीर आहां, तेव्हां बरोबरी म्हणून ही कुस्ती सोडण्यास मी तयार आहें.

**अक०:**—शिवाय आपल्या दोन्ही राष्ट्रांचा तह होण्याचें सांप्रत घाटत असल्यामुळें लवकरच शांतता होण्याचा संभव आहे; तेव्हां आपण दोघांनीं अशा वेळीं जातिमत्सरासारख्या—मी मोंगल तूं रजपूत अशा—क्षुल्लक कारणाकरितां एकमेकांचे गळे कापावयाला तयार होणें हें बरें नव्हे. दोघांपैकीं कोणीहि पडला तरी एका राष्ट्राच्या फायद्यापेक्षां दुसऱ्या राष्ट्राचें जास्त नुकसानच होणार आहे. तर दोस्त, दोन्ही पक्षांचीं सैन्यें रणांगणावर ज्या प्रसंगीं लढाईला उभीं रहातील त्या प्रसंगाशिवाय इतर प्रसंगीं, वैरभाव विसरून, आजच्या या द्वंद्वयुद्धाची आठवण म्हणून, एकमेकांशीं स्नेहभावानें वागण्यास आपण प्रारंभ करूं या.

**प्रेम०:**—वाः खरोखरच तुमची अशी इच्छा असेल तर माझ्याकडून मुळींच हरकत नाहीं. सांप्रत मला स्नेहाची फार जरुरी आहे, कारण या धर्मयुद्धाकरतां जोधपुराहून आलेले माझे सर्व स्नेही सांथीच्या तापाला बळी पडले असून सर्व रजपूत छावणींत स्नेही असा मला या वेळपर्यंत कोणीच राहिलेला नाहीं. अमीरसाहेब, माझें नांव आपणांला ठाऊक आहे. पण माझ्या या नवीन स्नेह्याचें नांव मला या वेळीं कळणें इष्ट नाहीं का ?

**अक०:**—मला " शेरकोह " म्हणतात. आणि प्रख्यात सेलकूज वंशांत माझा जन्म आहे. मी अकबराच्या पदरचा सरदार आहें. तेव्हां माझ्या सहाय्याची जर तुम्हांला केव्हां जरूर लागली तर—ही मुद्रिका घ्या;—ही शहाची शिक्याची आहे, माझ्यावर शहाची अतिशय मर्जी असल्यामुळें त्यानें ही मला दिलेली आहे,—ही खूण देऊन निरोप पाठविलांत, कीं मी तुमच्या मदतीला आलोंच असें समजा.—दोस्त, या जंगलांत आपल्याला कोणीकडे जावयाचें आहे !

**प्रेम०:**—मित्रा, या सांथीच्या तापानें आमचे शूर सेनापति महाराणा प्रतापसिंहजी फार बेमार आहेत. तेव्हां या वनांत राहणाऱ्या अमरनाथ साधूला भेटून त्यांजपासून कांहीं औषध, निदान त्याचा आशीर्वाद आणि त्याच्या मंदिरांतील देवतेचा प्रसाद घेण्याकरितां मी जात आहें. तर त्याच्या मठाचा मार्ग तुम्हांला माहीत असेल तर मला दाखवा.

**अक०:**—मला तो साधु व त्याचा मठ दोन्ही माहीत आहेत. तेव्हां त्याच्या मठाचा मार्ग मी दाखवितों. पण दोस्त, शहान्शहाच्या पदरीं त्याच्या छावणींत एक अतिविद्वान हकीम आहे. आणि कांहीं जडीबुट्टीच्या सहाय्यानें तोच साथीचा ताप बरा करतो. त्याच्याशिवाय दुसरे कोणालाहि हा ताप बरा करतां येणार नाहीं. जर आपली मर्जी असेल, तर आपण छावणींत परतल्यावर ही खुणेची आंगठी माझ्याकडे पाठवावी. म्हणजे शहाची परवानगी घेऊन त्या हकिमाला मी तुमच्या छावणींत तुमच्याकडे पाठवून देईन.

**प्रेम०:**—मग मी आणि सर्व रजपूत आपले जन्माचे ऋणी होऊं. पण अमीरसाहेब, आतां सायंकाळची वेळ होऊन रात्र पडत चालली, तेव्हां नवीन दोस्तीचा हा पहिला सुखकर प्रसंग येथेंच संपविणें तुम्हांआम्हांला भाग आहे.

**अक०:**—ठीक आहे. त्या साधूच्या मठाचा हाच रस्ता आहे. असे सरळ जा म्हणजे मठांत नेमके जाऊन पोहोंचाल. (प्रेमध्वज जातो.) (स्वगत) बादशहानें वेष पालटून असें एकट्यानें फिरूं नये म्हणून मला माझ्या दरबारांतील वृद्ध सरदारांनीं कितीदां तरी सांगितलें; त्यांचें म्हणणें न ऐकल्याबद्दल पश्चात्ताप होण्याची वेळ आज आली होती! प्रेमध्वजाच्या तलवारीचा तडाखा कोण तो! खरा वीर! खरा रजपूत! अमरनाथ साधूनें सांगितलें कीं, तो जोधपूरचा राजपुत्र आहे म्हणून; त्याची सत्यता त्याच्या तलवारीचा आघात सोसतांना मला तेव्हांच पटली. खरा रजपूत! वेष पालटून फिरूं नये—पण या अकबराच्या मनगटांतील शक्ति दाख-

विण्याची आजच्यासारखी संधि अशा गुप्तपणानें एकटा फिरलों नसतों, तर कोठून मिळाली असती? अकबराच्या औदार्याला आपल्या औदार्यानें लाजविणारे सज्जन छावणींत आहेत हें जसें आज प्रेमध्वजानें माझ्या अनुभवास आणून दिलें; त्याप्रमाणें प्रेमध्वजालाहि समजून चुकलें असेल, खऱ्या हाडाच्या रजपुताच्या मनगटाशीं मनगट झुंजविणारे वीर मुसलमानांच्या छावणींत कांहीं कमी नाहींत. बरें झालें, असल्या पराक्रमी पुरुषाच्या परोपकाराचें ओझें वाहण्याची आज मला संधि मिळाली; आणि मला वाटतें हिंदु-मुसलमानांच्या पुढें होणाऱ्या तहालाहि हा चांगलाच शकुन झाला. कारण मुसलमानांच्या शौर्यापेक्षां दिल्लीच्या बादशहाचें औदार्य रजपुतांच्या अनुभवाला आणून देण्याची इच्छा या असल्या प्रसंगामुळें माझ्या मनांत विशेष प्रबल झाली आहे. सरदाराच्या वेषानें ज्याप्रमाणें मी आतां प्रेमध्वजाला भेटलों त्याप्रमाणें हकिमाच्या वेषांत प्रतापसिंहाला—मुसलमानांच्या कट्ट्या शत्रूला-उदेपुरच्या त्या महाराण्याला मी भेटल्यावांचून रहाणार नाहीं. माझ्या जवळील औषधाच्या प्रभावानें तो बरा झालाच पाहिजे. कारण माझें मन मला सांगतें आहे, मुसलमानांच्या तलवारीच्या धाकानें हिंदु-मुसलमानांतील जी एकी घडवून आणणें आजपर्यंत शक्य झालें नाहीं, ती एकी शत्रूशींहि न्यायानें, औदार्यानें, व प्रेमानें वागून घडवून आणण्याकरितां परमेश्वरानें या अकबराला दिल्लीचें तक्त दिलेलें आहे. ही एकी घडवून आणण्याचीहि हीच वेळ. कारण उदेपुरच्या महाराण्याला बरा करतांना जोधपूरचा राजपुत्र—एकाद्या सरदाराच्या वेषांत लढत असलेला हा प्रेमध्वज—याच्या उपकाराची फेड करण्याची संधि मला मिळत आहे. औदार्याच्या आणि प्रेमाच्या जोरावर जर जोधपूर आणि उदेपूर हीं दोन घराणीं मीं आपलीशीं करून टाकलीं, तर मुसलमान व हिंदु यांमध्यें पूर्ण एकी होण्यास कितीसा उशीर लागेल! [ जातो.

## प्रवेश दुसरा.

स्थळ—अमरनाथ साधूचा मठ.

(गरुडध्वज प्रवेश करितो.)

गरु०:—काय त्रास आहे हा! आम्हीं राजे लोकांनीं देखील म्हणे या साधूंना भ्यालें पाहिजे. आपण तर निश्चय केला आहे, नसती भीडभाड आजपासून कोणाचीहि ठेवायची नाहीं.—दारू पितांना अमरनाथ साधु मला पाहील कीं काय या भीतीनें नरडें कोरडें पडून तडफडत मरण्याची पाळी मजवर आली आहे.—आतां मी साफ सगळ्यांना सांगतों, या बाजूला तुम्ही कोणीहि फिरकूं नका; आलांच तर डोळे मिटून ठेवा; म्हणजे मी दारू पितांना तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं. आणि तुमचे डोळे जर माझ्या हातांतल्या या शिशीवर आदळलेच तर जिभेला तरी लगाम घाला, म्हणजे मी दारू पीत असल्याची बातमी अमरनाथ साधूच्या कानांवर जाणार नाहीं. पण या साधूविधूंना मीं काय म्हणून भ्यावें? या, तुम्ही सर्वजण याच बाजूला या, डोळे फाडफाडून ही माझ्या हातांतील मदिरा पहा, आणि साधुविधूंच्या धोतांडाला भीक घालून माझ्या प्रियकरणीच्या सहवासाला क्षणभरहि मुकणारा हा गब्रू नव्हे, हें अमरनाथला खुशाल सांगा.—या, असे जवळ या, दूर दूर कां! माझ्या प्रियेकडे तुम्ही टक लावून एकसारखे पहात उभे राहिलां तरी मी तुमच्यावर रागावणार नाहीं, इतकेंच नव्हे तर तुमच्या ओठांनीं हिच्या मुखाला स्पर्श करावा म्हणून मी हिला अशी तुमच्यापुढें करीन. (बुद्धिसिंग येतो, गरुडध्वज शिशी लपवितो.) कोण बुद्धिसिंगजी, तुम्हीच का? मला वाटलें अमरनाथ साधु म्हणून! उगीच भ्यालों! खरें पाहूं गेलें असतां मीं काय म्हणून ह्या साधुसंतांना भ्यावें?

बुद्धि०:—नाहीं; भ्यालें पाहिजे. अकबर बादशहाशीं आपण तहाची वाटाघाट करीत आहों, आणि ती ह्या साधूचे मार्फत करीत आहों हें विसरूं नका.

गरु०:—मला वाटतें, या मदिरेच्या मार्फत जर तहाचें बोलणें लावलें तर लवकर काम फत्ते होईल! मनुष्याचें अन्तःकरण मदिरेंत भिजत ठेवलें असतां चटदिशीं विरघळतें; आणि अशा रीतीनें लिबलिबीत किंवा पातळ झालेल्या भिन्न जीवांचा मिलाफ व्हावयाला बिलकूल वेळ लागत नाहीं.

बुद्धि०:—मदिरेचा उपाय इतर प्रसंगीं गैरवाजवी नाहीं; पण आपण रणांगणावर सांप्रत धर्मयुद्धाकरितां उभे आहों; तेव्हां येथें मदिरेची योजना ठीक नाहीं. लढाईंत—

गरु०:—अहो कसली लढाई आणि कसलें काय! मला प्रयाग तीर्थाचें स्वामित्व पाहिजे आहे तें एवढयाचसाठीं कीं, माझ्या हातांतील या तीर्थाचें मी यथेच्छ प्राशन करीत असतांना धर्माभिमान्यांनीं मला नांवें ठेवूं नयेत. तसेंच तुम्ही या धर्मयुद्धांत पडला आहां ते थोडेच धर्माकरितां! माझा धर्म-ब्रिर्म जशी ही शिशी, तशी तुमची धर्मनिष्ठा म्हणजे—

बुद्धि०:—पद्मावती. गरुडध्वज, पद्मावतीवर माझें प्रेम बसलें असून तिच्या प्राप्तीसाठीं मी किती प्रयत्न करीत आहें हें तुम्हांस माहीत आहे. हें धर्मयुद्ध सुरूं होण्यापूर्वीच माझ्या बेताला मीं महाराण्याची व राणीची संमति मिळविली होती, पण पद्मावतीचा कल पहिल्यापासून माझ्याविरुद्ध! या धर्मयुद्धांत मी सामील झालों तो माझी छाप पद्मावतीच्या मनावर बसविण्याची संधि मिळावी म्हणून. पण या युद्धांत उदेपूरवाल्यांची व जोधपूरवाल्यांचीच वाहवा झाली आणि तुम्हांआम्हांला कोणीच विचारीनासें झालें!

गरु०:—असें झालें खरें! माझ्यापाशीं सैन्य रगड, पण पराक्रमाचे पोवाडे ऐकूं येतात प्रतापसिंहाचे!

बुद्धि०:—मजपाशीं हिकमत पाहिजे तितकी; पण पद्मावतीची दृष्टि वळते प्रेमध्वजाकडे! आणि हा प्रेमध्वज कोण आहे म्हणून समजलांत?

गरु०:—कोण म्हणजे? चोरून देखील दारू न पिणारा एखादा द्विपाद–नव्हे चतुष्पाद–प्राणी असेल झालें!

बुद्धि०:—(स्वगत) दारू पिणारा तुझ्यासारखा चतुष्पाद असता तर किती बरें झालें असतें!

गरु०:—कोण आहे सांगाल कीं नाहीं?

बुद्धि०:—जोधपूरचा राजपुत्र संग्रामसिंह, तोच हा प्रेमध्वज! अमरनाथ साधूंनीं आतांच ही हकीकत सांगितली! जोधपूरच्या महाराण्याचे मनांतून दोन हातांचे चार हात होण्यापूर्वी संग्रामसिंहानें ह्या धर्मयुद्धांत सामील होऊं नये असें होतें. पण तारुण्याच्या प्रारंभाचे वेळीं प्रेमाप्रमाणें शौर्यालाहि हूडपणाचे फांटे फुटत असल्यामुळें आजोळाहून ही स्वारी परस्पर गुप्त वेषानें रणांगणावर दाखल झाली! प्रेमध्वज म्हणजेच संग्रामसिंह, आणि तो पद्मावतीजवळ नेहमीं असतो; ही कल्पना डोक्यांत आली मात्र, असें झालें—

गरु०:—तुमचा चेहरा असा फिक्का कां पडला एकदम! या शक्तीचें सेवन करा म्हणजे पद्मावतीशीं लग्न करून दोन हाताचे चार हात करण्याच्या उमेदीला दोन पायांच्या ऐवजीं चार पायांची मदत मिळेल!

बुद्धि०: असली मदत तुमच्याकडून नको आहे मला! माझें तुम्हांला इतकेंच सांगणें आहे कीं, प्रयाग तीर्थ तुमच्या ताब्यांत येऊन प्रतापसिंहावर जर तुमचा नक्षा व्हावा अशी तुमची इच्छा असेल—

गरु०: -ही इच्छा नाहीं असें कोणी म्हटलें? सांगा, असें म्हणणाराचें नांव मला सांगा, त्याला दारूचा एक थेंब देखील मजकडून इत:पर मिळणार नाहीं!

बुद्धि०:—मग तुम्हीं असें करा, अमरनाथ साधूला भेटून निक्षून सांगा, अकबरशहाला पद्मावती दिल्यानें जर तह होत असेल आणि प्रयाग तीर्थ मुसलमान सोडून देत असतील, तर सर्व रजपूत राजांच्या तर्फे हा गरुडध्वज तह करण्यास तयार आहे.

गरु०:—हो, मी तह करायला तयार आहें. पण काय हो, पद्मावती अकबरशहाला दिल्यावर तुमचें आणि तिचें लग्न केव्हां होणार ? अकबरशहानें कंटाळून तिला टाकून दिल्यावर, का अकबरशहाच्या जनानखान्यांत ती जावयाच्या अगोदर ?

बुद्धि०:—तसें नव्हे हो. अशा अटीवर तुम्ही व तुमचे साथीदार तह करण्यास तयार आहेत, इतकेंच नव्हे तर तसें बोलणें चाललें आहे, असा पुकारा चोहोंकडे झाला पाहिजे. आलें का ध्यानांत ? असा बोभाटा झाला म्हणजे अकबरशहाच्या जनानखान्याचा बागुलबोवा दाखवून या नवीन संकटांतून सोडविण्याचें पुण्य मी पदरीं घेतों. या पुण्याबरोबरच पद्मावतीहि माझ्या पदरीं पडल्यावांचून राहायची नाहीं.

गरु०:—बरें आहे, तुम्हीं आतां सांगितलेंत तसें मी अमरनाथ साधूसमोर बरळतों. पण काय हो, दारूबाजाच्या बरळण्यावर त्यानें विश्वास नाहीं ठेवला तर ?

बुद्धी०:—तुमची इच्छा अशी अशी आहे; तुमचें सैन्य एवढें मोठें आहे; तुमचा खजिना एवढा मोठा आहे; इतके राजे तुमची कांस धरून चालतात; सर्व कांहीं मीं पूर्वीच कळविलें आहे, आणि आतां नुकताच साधुमहाराजांना भेटून सर्व बेत घट्ट करून आलों आहें. तुम्हीं नुसतें दर्शन घ्यायचें आणि होय म्हणायचें. हें पहा, पद्मावती नुकतीच देवीच्या दर्शनाला गेली आहे; तिची तिथें गांठ पडली तर पाहणार आहें. मी देवीचें दर्शन करून येतों तोंपर्यंत तुम्हीं साधुमहाराजांना भेटून या.

गरु०:—अहो, मी एकीकडे एकटा चोरून दारू पीत बसलों होतों;

मला कसा या साधूच्या मठीचा रस्ता आतां सांपडणार ? माझे नोकर-चाकरहि कोणी जवळ नाहींत ?

बुद्धि०:—ती पहा, प्रेमध्वजाला साधुमहाराजांनीं मघाशीं नजर केलेली विनोदी नोकरांची जोडी इकडेच येत आहे ! ए क्षया, ए वृद्धि, असे ह्या बाजूला या, आणि गरुडध्वज महाराजांना साधुमहाराजांच्या मठींत घेऊन चला.

[ बुद्धि० जातो. क्षय व वृद्धि येतात. ]

गरु०:—बरें झालें, ही जोडी आली ! अरे ए, असे या. मला साधु-महाराजांच्या मठीकडे नेण्याबद्दल मी तुम्हांला दारू पाजणार आहें. मला जवळच्या रस्त्यानें चट्दिशीं जो नेईल त्याला या शिशींत शिल्लक राहील ती दारू मी बक्षीस देईन. लांबच्या रस्त्यानें सावकास जर मला नेलेंत तर मठीच्या दरवाजाजवळ जाईतों सगळी शिशी रिकामी होईल; आणि तुम्हांला कांहींच मिळणार नाहीं. तेव्हां नीट विचार करा; आणि अगदीं जवळची वाट दाखविण्याची ताकद कोणाच्या अंगीं आहे तें मला प्रथम सांगा.

वृद्धि०:—तुम्हांला चांगलीशी बायको मिळून तुमच्या वंशाचा विस्तार या आर्यावर्तावर व्हावा अशी जर तुमची इच्छा असली तर साधुमहाराजांचे दर्शनाला जातांना तुम्हीं मला—या वृद्धीला—बरोबर घेऊन चला. तुम्हांला चांगलीशी बायको पाहिजे आहे ना ?

गरु०:—मला चांगलीशी बायको नको; चांगलीशी दारू पाहिजे.

क्षय०:—तर मग तुम्ही या क्षयाला बरोबर घेऊन चला. महाराज, आपण या वृद्धीच्या नांवावर फसूं नका. ही माझी बायको होऊन आज कित्येक तपें उलटून गेलीं तरी आमच्या घरांत क्षय आणि वृद्धि या जोड-प्याशिवाय दुसरें कोणाचेंहि तोंड दिसूं लागलें नाहीं. विधवेइतकाच अप-शकुन वांझ बायकोचा मानला पाहिजे.

वृद्धि०:—मूर्तिमंत क्षय जिचा नवरा, तिला मुलेंबाळें कसलीं होणार ! आम्हां दोघांत अपशकुनी नवरा आहे. बायको अपशकुनी नव्हे हो. हा मेला जातीचा क्षय, तरी आज कित्येक तपें माझ्या संगतीला असल्यामुळें अजून मेला नाहीं. मी रोजच्या रोज वाढत असतें आणि हा मेला रोजच्या रोज मरत असतो. माझी रोजची वाढ याच्या रोजच्या मरणानें खाऊन टाकल्यामुळें मी वांझ दिसतें. म्हणून म्हणतें महाराज, आम्हां दोघांना बरोबर नेलेंत तर तुमच्या कल्याणाइतकेंच तुमचें अकल्याण होईल. मला एकटीला बरोबर न्या; म्हणजे तुमचें कोटकल्याण झाल्यावांचून राहणार नाहीं. आपलींच पिलें आपण खाऊन टाकून आपल्या मांजरीला वांझ म्हणणाऱ्या या बोक्याला, तुम्ही आपल्या दिमतीला मुळींच घेऊं नका.

गरु०:—दारू प्यालों आहें मी, आणि अंमल चढला आहे यांच्या अंगावर ! देवाच्या व साधूंच्या घरीं कारणाशिवाय कार्य घडून येतें म्हणून म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं !—मी दारू पितों आणि तुम्ही झिंगून बरळूं लागा.

क्षय०:—महाराज, तुम्ही जर मला बरोबर नेलें नाहीं, तर संकटांतून तुमचा बचाव होणें शक्य नाहीं. पुष्कळ मुलें होऊन मांजरीवर उपाशी तडफडण्याची पाळी येण्यापेक्षां कांहीं मुलें बोक्यानें खाऊन टाकावीं हें बरें नाहीं का ? आपलेच वैरी आपल्या मुलांचा वेष घेऊन आपल्या भोंवती जमतात. अशा वेळीं त्यांना अचुक खाऊन टाकणारा बोका आपल्या जवळ असणें अगदीं जरूर आहे. म्हणून म्हणतों कीं या वृद्धीला नेलीत तर इच्या पाठोपाठ मला नेलेंच पाहिजे.

गरु०:—साधुसंतांच्या मठाचा हा एक चमत्कार चांगला आहे, मदिरेचा पगडा पिणाऱ्यापेक्षां न पिणारावर असल्या जागीं अधिक बसतो ! आणि यामुळें अमरनाथ साधूच्या समोर जायच्या वेळेला मी झिंगून पड-

ण्याची आतां भीतीच नाहीं. हं, बोला, कोण मला वाट दाखविणार ?

वृद्धि०:—हा येणार असला तर मी साफ येणार नाहीं.

क्षय०:—ही जिथें जाईल तिथें मी गेल्याशिवाय रहायचा नाहीं.

वृद्धि०:—मला बरोबर न्या, म्हणजे तुमच्या दोन हातांचे चार हात होतील.

क्षय०:—हिच्या पाठीवर मला ठेवा, म्हणजे तिसरा हात फुटायला लागल्यावर पहिला हात गळून पडेल. आणि हें असें वेळींच झालें म्हणजे वाढलेल्या हातांचें ओझें कमी करण्याकरितां सहस्रार्जुनाप्रमाणें महांकालाचा धावा करण्याची पाळी आपल्यावर येणार नाहीं.

वृद्धि०:—हा एक मेला चालता बोलता मृत्यूच आहे. हप्त्याहप्त्यांनीं रोज मरण्याची इच्छा असली, तर याला बरोबर न्या.—असें यावें महाराज.

क्षय०:—आणि ही चालती बोलती वाढ आहे. हिला जर जवळ ठेवलीत तर एखाद्या भोपळ्यासारखें हां हां म्हणतां फुगाल आणि मठांत शिरणें एका बाजूला राहून दरवाजांतच अडकून पडाल.—असें यावें महाराज.—

वृद्धि०:—महाराज, आपला कल क्षयाकडे दिसतो. लागले रोडायला, लागले रोडायला !

क्षय०:—काय, वृद्धीकडे पाहूं लागलां ! लागले फुगायला ! एवढे ! एवढे ! एवढे ! अबब ! किती मोठे झालां ! आतां या सुटलेल्या अंगावर व वातावर कितीहि औषधें घेतलींत—अबब ! अधिकच फुगायला लागले—फुगा ! असेच फुगा—तुम्हाला बिलकूल गुण येणार नाहीं. वृद्धीच्या अंगाला हात लावण्याच्या अपराधाबद्दल रोज मला—क्षयाला—एकशें आठ नमस्कार घातल्याशिवाय तुमचा रोग बिलकूल कमी होणार नाहीं—फुगा, असेच फुगा.—आतां नमस्काराशिवाय हा क्षय बोलायचाच नाहीं.

वृद्धि०:—पहा, त्या क्षयाच्या पायां पडतां नाहीं का ? रोडा, असेच रोडा, असेच पाण्याचे पितर व्हा. लागली, राजबिंड्या देहाची वात बनायला लागली ! लागले वाळायला, लागले रोडायला !

गरु०:—ही कोण किटकिट माझ्या मागें लागली आहे. दारू पिऊन झिंगलेला मनुष्य फारच मिठास बोलतो, आणि तुम्ही तर माझी थट्टाच आरंभली आहेत! तेव्हां दारू पिऊन तुम्ही झिंगलां नाहीं हें खास. मला तुमच्या अमरनाथ साधूचें दर्शनहि नको आणि तुमच्या भाषणाची भगभगहि नको. एकसारखें बोलून पुरे वाट करून सोडली यांनीं; मला दारू प्यायची फुरसत देखील देत नाहीं म्हणजे काय? बस्स, मला तो तहहि नको, आणि तुमचा साधूहि नको. एकांतांत एकटा या देवीचें भजन, पूजन, सेवन करीत बसणार. (प्रेमध्वज येतो) तो पहा, तुमचा नवा मालक इकडेच येत आहे. लागा त्याचे मागें आणि न्या त्याला माझ्याऐवजीं साधुमहाराजांच्या मठींत. [ जातो.

प्रेम०:—ए वृद्धि, तूं मला देवीच्या मंदिरांत घेऊन चल. क्षया तूं दरवाजावर उभा रहा आणि मी देवीचें दर्शन घेऊन येईपर्यंत बिगरहुकमानें आंत शिरूं पाहाणारावर तूं आपली नजर ठेव. चल, वृद्धि चल. देवीच्या मंदिराची वाट मला दाखीव. पण देवीचें दर्शन झाल्यानंतर माझ्याभोंवतीं लुडबुडत राहून मला उगीच घोटाळ्यांत पाडूं नको.—सौभाग्याच्या आणि सौंदर्याच्या मंदिरांत शिरतांना वृद्धीचा उपयोग द्वारापर्यंत असतो. मंदिरांत जर तिला येऊं दिली तर अधिकाधिक मोठें व्हावें या फाजील महत्त्वाकांक्षेनें सर्व मंदिर व्यापलें जाऊन मालकाच्या स्वैर संचारांना आणि विलासांना अवकाशच राहात नाहीं.—चल वृद्धि, मला मंदिराचा दरवाजा दाखीव.

वृद्धि०:—या मेल्याला असाच दाराबाहेर उभा केला पाहिजे.

[ प्रेम० जातो.

क्षय०:—हिला दरवाजाच्या आंत पाऊल टाकूं देऊं नका. दरवाजाच्या आंत एकदां ही शिरल्यावर स्त्रियांच्या नाजूक पेहेरावाचें अनुकरण करणाऱ्या या क्षयानें तुमच्या घरांत बिऱ्हाड ठेवलेंच म्हणून समजा.

( दोघे दोन बाजूंनीं जातात.

———

## प्रवेश तिसरा.

स्थळ—भवानीचें मंदिर.

( बुद्धिसिंग येतो. )

बुद्धि०:—पद्मावती मी आतां येथें पाहिली, कोठें गेली ती? देवीजवळ एकटीच प्रार्थना करीत होती; ही संधि साधल्यामुळें माझें कामी मन आनंदानें उचंबळूं लागलें होतें; मृगजलाच्या नादीं तूं लागला आहेस, असें मला बजावण्याकरितां ती एकाएकीं अंतर्धान कशी पावली?—माझे डोळे पद्मावतीला शोधून काढण्यांत गुंतले असतांना ही उग्र देवता मजकडे रागानें पाहात आहे! शूरपणाच्या घमेंडीनें आम्हां बुद्धिवान् मुत्सद्यांवर डोळे फाडणाऱ्या वीरांना डावपेंचांच्या जाळ्यांत पकडण्याची खटपट करून त्यांचा नक्षा मी उतरवीत असतों, पण देवळांतील देवतांनों, तुमच्या असल्या दटावण्याला माझें कामी मन बिलकूल भीक घालीत नाहीं. आम्ही कामीजन देवतेवर उजेड पाडणाऱ्या दिव्याच्या तेजाला देखून—मिणमिणीत व अंधुकहि उजेडाला पाहून—दचकतों, देवळाची झाडलोट करणाऱ्या एखाद्या म्हाताऱ्या दासीचा दुबळा श्वासोच्छ्वास ऐकून लटलट कांपूं लागतों; पण प्रियकरणीची गांठ पडण्याचे वेळीं देवळांतील सिंहासनावर मांडलेल्या मूर्तीचें अस्तित्वच आम्हाला कबूल नसतें.—पहा मजकडे रागारागानें पहा. तुझी क्रूर मुद्रा मला ‘नको’ ‘नको’ म्हणून बजावीत असतांहि पद्मावतीला हुडकून काढून, भवाने, तुझ्या देखत तिचा हात पकडण्याचा धीटपणा—पण हा कोण! पद्मावती त्या खांबाच्या आड गेलीशी दिसली—हा कोण—प्रेमध्वज—प्रेमध्वज—प्रेमध्वजाशीं एकांत करण्याकरितां मघांशीं नाहींशी झाली हं!—प्रेमध्वजा, मघांशीं जंगलांत माझ्या शिकारीच्या आड आलास आणि आतां इथें महालांतहि माझें सावज

पळवूं पाहतोस काय ?—ये, खुशाल ये, अरे, तीहि खांबाच्या आडून आडून याच्या पाठोपाठ येत आहे. मजकडे पाहतांना नेहमीं सूर्याप्रमाणें प्रखर दिसणारे तिचे डोळे, प्रेमध्वजाकडे पाहतांना कोंवळ्या किरणांचा वर्षाव करणाऱ्या चंद्रासारखे कोमल व्हावेत हं !—माझा संशय खरा होऊं पहात आहे.—या, तुम्ही दोघेहि या, आणि देवतेला साक्षी ठेवून एकजीव होण्याकरितां तुम्ही आतां भवानीपुढें उभे रहा, देवतांनीं जरी आपली संमति दिली तरी तुमच्या असल्या चाळ्यांवर चोरटी नजर ठेवणारा हा बुद्धिसिंग तुमच्या एकीची बेकी केल्यावांचून रहाणार नाहीं. आड लपून राहून यांच्या चेष्टा पाहिल्याच पाहिजेत. [ जातो. प्रेमध्वज येतो.

**प्रेम०**:—भवानीच्या मंदिरांत पाय ठेवल्यापासून लढाईचें वारें माझ्या अंगांत शिरावयास पाहिजे होतें. पण येथें माझ्या मनाची शांत वृत्ति आहे ! काय असेल तें असो, हिंदूंचा आणि मुसलमानांचा तह होणार असेंच माझ्या मनाला वाटूं लागलें आहे. रणांगणासंबंधाचे सर्व विचार माझ्या मनांतून पळून गेले आहेत, आणि या दीपोत्सवामुळें तर अंतःकरणांतील सगळ्या मधुर वृत्ति उच्चंबळूं लागल्या आहेत.—दीपज्योतींतील तेज आणि प्रेमाचे किरण हीं एकमेकांचा प्रकाश व प्रभाव दुणावीत असतात. सजातीयांचीं गांठ पडली म्हणजे दुबळाहि प्रबल होतो; तेव्हां माझा प्रेमा या दीपोत्सवामुळें अनिवार होऊन, रणदेवतेच्या दर्शनानें उत्पन्न होणाऱ्या कठोर वृत्तींना दडपून टाकण्यास समर्थ व्हावा, यांत कांहीं आश्चर्य नाहीं !—शकून तर चांगले होत आहेत. देवी कशी प्रसन्न होणार हें मात्र कळत नाहीं. असो, दर्शन तर घेऊं या. ( दर्शन घेऊन गुडघे टेंकून ) रणभूमीवर शत्रूशीं निकरानें लढणाऱ्या प्रत्येक वीराचे मस्तकावर, भवानी माते, तुझा वरदहस्त असतोच; रजपुतांच्या धैर्याचा कैवार, माते, तुला; रजपुतांच्या अब्रूचा अभिमान, माते, तुला; रजपुतांच्या विजयाची काळजी,

माते, तुला. आजपर्यंत रजपुतांचें यश मलीन न होऊन देण्याची खबरदारी रणांगणावर तूं जशी घेतलीस त्याप्रमाणें सांप्रतच्या धर्मयुद्धांत यापुढेंहि रजपुतांची अपकीर्ति न होऊं देण्याबद्दल, माते, तूंच सावध राहिलें पाहिजे. तुझ्या आशीर्वादानें लढाईत यश कसें मिळवावें हें मला माहीत आहे; पण लढाईशिवायकरून इतर भानगडींत पडतांना दृष्टि अंध होते, बुद्धि बावरते, आणि मन कचरून जातें. या धर्मयुद्धाकरितां आलेले रजपूत राजे सांप्रत अकबरशहाशीं तह करण्याच्या उद्योगांत आहेत, आणि रजपुतांतला रजपूत, महाराणा प्रतापसिंह, याची बिघडलेली प्रकृति पुन्हां ताळ्यावर आणण्याकरितां मुसलमानांच्या छावणींतलें औषध रजपुतांच्या छावणींत नेण्याच्या खटपटींत मी आहें. जगदंबे, या दोन्ही कामांत यश दे, अशी या तुझ्या दीन भक्ताची तुझ्या पायांपाशीं प्रार्थना आहे.

[ पद्मावती पुढें होते आणि त्याच्या हातावर हार टाकते.

**पद्मा०:**—दोन्ही कामांत यश मिळो.

**प्रेम०:**—अक्राळविक्राळ स्वरूपाच्या भवानीनें असें मधुर रूप एकदम कसें धारण केलें! खड्ग, त्रिशूळ वगैरे आयुधांनीं भयानक दिसणारे ते भवानीचे हात नूतन पल्लवाप्रमाणें एकदम कोमल कसे झाले! रणमैदानावर शिंपडलेल्या रक्ताच्या प्रतिबिंबानें नेहमीं आरक्त असलेले ते भवानीचे डोळे चंद्रोदयाबरोबर विकास पावणाऱ्या कमलिनीप्रमाणें निर्मल लावण्याचें भांडार कसे बनले! ती चेहेऱ्यावरील उग्रता एकाएकीं नाहींशी होऊन नवयुवतीच्या गालावरील गोड हास्य त्या ठिकाणीं कसें नाचूं लागलें!—तूं कोण? देवलोकींची अप्सरा, कीं इहलोकची—-

**पद्मा०:**—पद्मावती आहें.

**प्रेम०:**—कोण राजकन्या पद्मावती? महाराणा प्रतापसिंहाची बहीण पद्मावती? रजपूतछावणींत सौंदर्यतिलक म्हणून नांवाजलेली तीच तूं

पद्मावती ! प्रतापसिंहानें जिच्या दिमतीला मला नेमलें आहे आणि जी माझ्या नेहमीं दृष्टीस पडते, तीच तूं पद्मावती ! होय, तीच पद्मावती. राजकन्ये, अवचित गांडीच्या या चमत्कारामुळें मन मांबावून जाऊन मी भलतेंच बरळून गेलों; त्याबद्दल मला माफी कर. आपल्यासारख्या कुमारिकेशीं बोलतांना जी मर्यादा रजपूत वीरांनीं पाळिली पाहिजे तिचें उल्लंघन कदाचित् आतां माझ्या हातून झालें असेल, पण हा अपराध माझा नसून—

**पद्मा०**:—मग कोणाचा अपराध ? बेहोष प्रेम्याप्रमाणें बरळण्याला मीं तुम्हांला उत्तेजन दिलें होतें काय ?

**प्रेम०**:—हा अपराध माझाहि नाहीं, आणि तुझाहि नाहीं. देवांगनांना लाजविणाऱ्या तुझ्या लावण्याचा आहे. तुझें लावण्य जर अप्रतिम नसतें तर ही क्रूर देवता भवानी महालक्ष्मीचें रूप घेऊन अवतरली अशी मला भूल कशी पडली असती ?

**पद्मा०**:—मूळचा अपराध कोणाचाहि असो, पण अपराध हातून घडत आहे असें समजल्यानंतरहि पुनः पुन्हां तेंच बरळत राहणें म्हणजे मद्यप्या प्रमाणें वेडगळपणाचें नाहीं का ?

**प्रेम०**:—होय, वेडगळपणाचेंच आहे; नाहीं कोण म्हणतो ? मद्यपी झिंगत चालला म्हणजे मद्यावरील त्याची आसक्ति वाढत जाते; तसेंच लावण्यवारुणीनें आपणास मोह पडत चालला आहे, असें समजल्यानंतरच लावण्यांतील खरी चकाकी ध्यानांत येते. तेव्हां—पहिला—दुसरा—

**पद्मा०**:—आणि आतांचा हा तिसरा—

**प्रेम०**:—सर्व अपराध तुझ्या लावण्याच्याच पदरांत टाकले पाहिजेत.

**पद्मा०**:—माझ्या लावण्याचें हें पुराण इतकेंच पुरे. मी तुम्हांला काय बरें विचारणार होतें ?

**प्रेम०**:—( स्वगत ) लावण्याचें वर्णन वायां गेलें नाहीं.

पद्मा०:—मी तुम्हांला काय विचारणार होतें,–हो–तुम्ही काय बोलत होतां मघांशीं ? कायसेसें माझ्या मनांत आलें आणि मीं तो हार तुमच्या हातावर टाकला. काय बरें माझ्या मनांत आलें ? तो हार मीं कां बरें तुम्हांला दिला ? कायसेंसें—

प्रेम०:—तें–कायसेंसें–त्याचेंच वर्णन मीं इतका वेळ केलें. तें वर्णन तूं पुरे म्हणून सांगितलेंस म्हणून मी गप्प बसलों. तें–कायसेंसें–त्यानेंच तुझ्या-प्रमाणें मलाहि गोंधळून सोडलें आहे. बोलून टाकूं का तें एकदम पुरतें ?

पद्मा०:—तसें नव्हे हो. तुमच्या हातावर हार टाकण्यापूर्वीच कायसेंसें माझ्या मनांत आलें—

प्रेम०:—आणि तेंच कायसेंसें, हार टाकल्यानंतर, माझ्या मनांत शिरलें. तें कायसेंसें काय हें तुला माहीत नाहीं; तें कायसेंसें काय हें मलाहि माहीत नाहीं. या बेटया हाराशीं त्या कायसेंसेंचा संबंध दिसतो. त्याला विचारतेस का तें कायसेंसें काय तें ? हा हार तुझ्या परिचयाचा अधिक असल्यामुळें तुझ्याशीं तो लवकर बोलूं लागेल; म्हणून याला हातांत घे. पण नाहीं, मी तुला हार द्यायचाच नाहीं. माझ्याशीं बोलायला यानें उशीर लावला तरी हरकत नाहीं. पण या चालत्याबोलत्या देवतेचा प्रसाद म्हणून—

पद्मा०:—हो, आतां आठवलें. तुम्ही देवीचा प्रसाद मागत होतां आणि प्रसाद म्हणून त्या वेळीं मीं हार तुम्हांला दिला. आपण गुडघे टेकून भवानीची प्रार्थना करीत असतांना त्या खांबाच्या आड मी उभी होतें; आणि आपली प्रार्थना संपली त्या वेळीं आपल्या कार्याला यश मिळावें याच एका बुद्धीनें मीं आपल्या हातावर प्रसाद म्हणून तो हार टाकला. या प्रसादाचा भलतासलता अर्थ जोधपूरचे सरदार प्रेमध्वज करणार नाहींत अशी त्या वेळीं मला खात्री वाटली. हें माझें वाटणें जर चुकीचें नसेल तर देवीजवळ आपण केलेल्या प्रार्थनेसंबंधानें मला कांहीं विचारावयाचें—

**प्रेम०:**—चमत्कारिक रीतीनें गांठ पडल्यामुळें भलतीच भूल मला पडली ! आपला तसा हुकूम आहे, या हाराचा भलतासलता अर्थ मी कधींहि करणार नाहीं. आपल्याला जें कांहीं विचारावयाचें असेल तें मोकळ्या मनानें खुशाल विचारा.

**पद्मा०:**—मला प्रथम असें विचारावयाचें आहे कीं, या धर्मयुद्धांत मुसलमानांचा पुरा पराभव व्हावा म्हणून रजपुतांनीं आज इतकीं वर्षें खस्त खाल्ली असतां तह करण्याची इतकी उत्सुकता आज आमच्या राजमंडळांत कां उत्पन्न झाली ?

**प्रेम०:**—तह होऊं नये व अखेरपर्यंत रजपुतांनीं लढून यश संपादन करावें, असें कां आपल्याला वाटतें ?

**पद्मा०:**—उदेपूरच्या राजघराण्यांतील कोणत्या राजकन्येला असें वाटणार नाहीं ? जोधपूरच्या सरदारांना—प्रेमध्वजांना—यश मिळेपर्यंत रजपुतांनीं लढूं नये असें वाटतें का ?

**प्रेम०:**—असें कसें वाटेल ? असें असतें तर जोधपूरची बहुतेक सर्व छावणी या तापाच्या सांथीनें ओस पडल्यानंतरहि राहिलेल्या थोड्या लोकांनिशीं उदेपूरच्या निशाणाखालीं समरांगणावर उभा राहण्यास मी कसा तयार झालों असतों ? या धर्मयुद्धांत लढाईची हौस भागवावी म्हणून ना मी जोधपूरच्या राण्याची सरदारकी सोडून उदेपूरच्या राण्याची ताबेदारी पत्करली ?

**पद्मा०:**—मग 'लवकर तह होऊं दे' अशी आपण भवानीची प्रार्थना कशी केलीत ?

**प्रेम०:**—मीं ही प्रार्थना केल्यावर, तहाच्या कामांत यश येऊं दे असा आशीर्वाद आपण तरी मला कां दिला ?

**पद्मा०:**—माझे दादा महाराणा प्रतापसिंह यांना सांथीच्या तापानें ग्रासलें आहे; आणि या तापावर मोंगलांच्या छावणीशिवाय दुसरें कोठेंहि चांगलें

औषध नाहीं. म्हणून तेवढ्यापुरतें मला वाटलें कीं थोडा वेळ तरी तह व्हावा.

**प्रेम०:**—याच कारणासाठीं तह व्हावा असें मला सुद्धां वाटतें.

**पद्मा०:**—इतर राजांप्रमाणें युद्धाला तुम्ही खरोखर कंटाळलेले नाहीं ना ?

**प्रेम०:**—वारंवार हा प्रश्न विचारण्याचें कारण नाहीं समजत !

**पद्मा०:**—मला वाटतें, कोणत्या अटीवर तहाचें बोलणें चाललें आहे हें आपल्याला माहीत नसावें. तें जर माहीत असतें तर माझ्या बोलण्याचा अर्थ आपल्याला समजला असता.

**प्रेम०:**—नाहीं, मला माहीत नाहीं. तहासंबंधीं वाटाघाट चालली असून–

**पद्मा०:**—कोणत्या अटीवर तह करण्यास शहा तयार आहे, हें अमरनाथ साधूंनीं आपल्याला सांगितलें नाहीं तर एकूण.

**प्रेम०:**—नाहीं, मला सांगितलें नाहीं. कोणत्या अटीवर तह व्हावयाचा आहे ?

**पद्मा०:**—ज्या या प्रयाग तीर्थासाठीं सांप्रतचें धर्मयुद्ध माजलें आहे तें प्रयाग तीर्थ सोडून देण्यास मुसलमान तयार आहेत; पण त्यांची एकच अट आहे.

**प्रेम०:**—कोणती ती अट ?

**पद्मा०:**—उदेपूरची राजकन्या पद्मावती हिनें बादशहाची अर्धांगी होऊन–

**प्रेम०:**—काय ? साधु अमरनाथजींच्या तोंडून ही अट बाहेर पडली ! रजपूत राजमंडळापुढें ही अट बोलून दाखविण्यास कोण समर्थ आहे ? या अटीवर कोण तह करणार ? अशा तापाच्या शेंकडोंशें सांथी आमच्या छावणींत एकसारख्या फैलावूं देत, एक तरी रजपूत सरदार जिवंत असेपर्यंत पद्मावतीबद्दल मागणी घालण्याची अकबर शहाची काय छाती आहे ?

**पद्मा०:**—पण राजमंडळाला ही अट कबूल आहे !

**प्रेम०:**—कोणच्या राजमंडळाला ही अट कबूल आहे ? महाराणा

प्रतापसिंह याला ही अट कबूल आहे? जोधपूरच्या सरदारांना ही अट कबूल आहे? जोधपूर व उदेपूर येथील सरदारांना जी अट कबूल नाहीं ती अट इतर रजपुतांना कबूल असून काय कामाची?

**पद्मा०:**—कां बरें, तुम्हांला ही अट कबूल कां नाहीं? माझे दादा महाराणा प्रतापसिंह यांनीं जर मला अकबरशहाला देऊं केली तर या गोष्टीला आपण आपली संमति द्याल कीं नाहीं?

**प्रेम०:**—काय? महाराणा प्रतापसिंह आपली बहीण अकबरशहाला द्यायला तयार!

**पद्मा०:**—मला तर मघांशीं साधु अमरनाथजींनीं दिल्ली तक्ताची मालकीण लवकरच होणार ना, असा प्रश्न केला, आणि भवानीची प्रार्थना कर म्हणजे तुझ्या मनासारखें होईल असें सांगितलें. देवीची मी प्रार्थना करीत होतें इतक्यांत आपण आलां—

**प्रेम०:**—काय, दिल्लीच्या तक्ताच्या मालकिणीचें पद मिळावें अशी का तुमची इच्छा आहे? बादशहाशीं लग्न व्हावें या इच्छेमुळें लवकर तह व्हावा असें का तुम्हाला वाटतें? असल्या या तहांत रजपुतांना यश यावें म्हणून का हाराचा प्रसाद आपण माझ्या हातांत टाकला? प्रत्यक्ष भवानीनें प्रसाद म्हणून हा हार मला दिला असता तरी भवानीपुढें हा प्रसाद असा (हार पद्मावतीपुढें फेंकतो) फेंकून देऊन मी भवानीला बजावलें असतें कीं, कृतांत काळाचें रूप धारण करून प्रेमध्वजाच्या देहाचा पुरा नाश करीपर्यंत प्रत्यक्ष परमेश्वरी संकल्पहि या कामीं सफल व्हावयाचा नाहीं.

**पद्मा०:**—(हार उचलून) नका, तुम्ही असे रागावूं नका. राजमंडळाप्रमाणें आपलेंहि मत आहे कीं नाहीं हें समजावून घेण्याकरितां मी तसें बोललें. उदेपूरच्या राजघराण्यांतल्या कोणच्याहि राजकन्येची तशी इच्छा असणें शक्य नाहीं. या तापाची सांथ शमेपर्यंत थोडा वेळ लढाई बंद

ठेवण्यास जर शहा कबूल असला तर तेवढ्यापुरता तह व्हावा अशी माझी इच्छा आहे.

**प्रेम०:**—माझें झालें तरी असेंच मत आहे.

( वृद्धि, क्षय, राणी, व दासी प्रवेश करितात. )

**वृद्धि०:**—राणीसाहेब, त्या पहा पद्मावती बाईसाहेब प्रेमध्वजाबरोबर प्रेमाच्या गोष्टी बोलण्यांत गुंतल्या आहेत. आमच्या या देवीच्या मंदिराचा चमत्कार असा आहे, देवीच्या दर्शनाला कोणचीहि कुमारी आली म्हणजे ती पुढें सहा महिने देखील अविवाहित राहूं शकत नाहीं.

**राणी०:**—वत्सं, या वृद्धीचें बोलणें ऐकलेंत का? आतां सहा महिन्यांच्या आंत तुमचें लग्न झालें पाहिजे. अमरनाथ साधु असेंच म्हणत होते. दिल्लीच्या तक्तावर बसून तुम्ही म्हणे थोड्या दिवसांनीं आम्हां सगळ्यांना हुकूम सोडणार!

**क्षय०:**—आणि ताईसाहेब, या दिल्लीसहि या क्षयाला आपणाबरोबर न्यायला चुकूं नका.

**प्रेम०:**—रजपूत कुमारिकांच्या अगोदर आम्हां सरदारांच्या या तलवारी दिल्लीचें तक्त गांठतील आणि मग तेथें क्षय अक्षय्य नांदेल.

**वृद्धि०:**—राणीसरकार, ताईसाहेबांनीं तो हार त्या सरदाराच्या हातांत टाकला होता.

**पद्मा०:**—काय असेल तें असो! हा साधु अमरनाथ आणि त्याच्या जवळचीं हीं माणसें पायरी सोडून बोलणारीं दिसतात. त्या साधूनें माझ्यापुढें दिल्लीच्या तक्ताचें वर्णन केलें आणि अकबरशहासारखा पति मिळावा म्हणून हिंदु राजकन्या कशा झुरत असतात याचें पुराण त्यानें माझ्यापुढें वाचलें. हिंदु साधूंनीं जर हिंदु धर्माची पायरी सोडली तर आमच्या वीर पुरुषांच्या नुसत्या तलवारींनीं हिंद धर्माचें संरक्षण कसें होईल? या

धर्मयुद्धांत आपली पायरी जशी अमरनाथ साधूला ओळखतां आली नाहीं, त्याचप्रमाणें थट्टेंत व विनोदांतहि त्याच्या या नोकरांना स्वतःची पायरी समजत नाहीं.

**क्षय०:**—अशा रीतीनें पायरी सोडून ही वृद्धि उडया मारीत पुढें चालली म्हणजे तिची वाढच सर्वांना त्रासदायक होऊं लागते. आणि एवढयाचकरितां माझी–क्षयाची–सांगड या वृद्धीशीं साधुवर्यांनीं कायमची घातली आहे.

**प्रेम०:**—काय रे तुला दरवाजाबाहेर उभें रहावयाला सांगितलें होतें ना ? आणि मग तूं आंत कसा आलास ?

**क्षय०:**—राणीसाहेबांना ताईसाहेब कुठें आहेत त्या सांपडेनात, वृद्धि त्यांना भलत्याच दिशेकडे घेऊन जाऊं लागली, असा सगळाच घोंटाळा माजला. तेव्हां मला इथें हजर राहणें भाग पडलें. मला बाहेर ठेवा किंवा दुसरे कोठेंहि कोंडून ठेवा, जिथें घोंटाळा आणि अंदाधुंदी माजली आहे तिथें हा क्षय हजर असावयाचाच.

**राणी०:**—पण खरेंच वन्सं, माझी नजर चुकवून तुम्ही अशा एकीकडे कशाला आलांत ?

**पद्मा०:**—हें काय ग वहिनी, वृद्धिक्षयांच्या चावटपणाच्या भोंवऱ्यांत तूं सुद्धां सांपडलीस ! दादाला लवकर बरें वाटूं दे म्हणून भवानीची स्वस्थपणानें प्रार्थना करण्याकरितांच मी भवानीच्या दर्शनाला एकटीच आलें. तापाच्या सांथीवरील मोंगलांच्या छावणीमधील औषध प्रेमध्वजांच्या हातीं लागल्यासारखें झालें असून त्या औषधानें दादाला लवकर गुण येऊं दे म्हणून देवीची करुणा भाकावयाला तेहि इथें आले. तें औषध रजपूत सरदारांच्या हातीं पडत असलेलें पाहून देवीचा प्रसाद म्हणून मी तो हार त्यांच्या हातांत टाकला. याबद्दल येवढे तर्ककुतर्क कशाला पाहिजेत !

**राणी०**:—सरदारसाहेब, खरेंच का तें औषध तुम्हांला सांपडलें ?

**प्रेम०**:—होय सरकार! मला तें औषध मिळाल्यासारखेंच आहे.

**राणी०**:—असें असेल तर आम्हांला भवानीच पावली म्हणावयाची. चला वत्सं, आतां अधिक वेळ येथें घालवतां कामा नये. साधु अमरनाथजींचें दर्शन घेऊन पुढील बेत ठरविला पाहिजे.

**पद्मा०**:—आमचे दादा बरे झाल्यावर तहाची वाटाघाट आपोआप बंद पडेल—

**राणी०**:—आणि मग उदेपूरच्या राजघराण्यांतलें हें कमळ मुसलमानांच्या हातीं पडण्याची भीति रजपूत सरदारांना उरणार नाहीं.

[ प्रे० शिवाय सर्व जातात.

**प्रेम०**:—( स्वगत ) माझ्या तर्काप्रमाणें जर पद्मावतीच्या मनाची खरी स्थिति असेल तर किती मजा होईल! अहाहा! तिची ती प्रसाद म्हणून हार टाकण्याची शैली तरी किती मोहक.—राणीचा कल इतक्या दिवस माझ्याकडे नव्हता; पण मोंगल छावणींतलें औषध माझ्या हातीं लागल्यासारखें आहे, असें ऐकल्याबरोबर राणीचा ग्रह एकदम पालटल्यासारखा दिसला! माझ्या खटपटीमुळें जर राणा प्रतापसिंह बरा झाला, आणि हें धर्मयुद्ध संपल्यानंतर जोधपूरचा राजपुत्र संग्रामसिंह तोच मी, हें सर्वांना समजलें, मग—मग—माझ्या सुखाच्या आड कोण येणार आहे ?

[ जातो. बुद्धिसिंग पुढें येतो.

**बुद्धि०**:—मी येणार आहें. प्रेमध्वजा, मी तुझ्या सुखाच्या आड आल्यावांचून कसा राहीन? अरे, मीं आज कांहीं वर्षें रोंखून ठेवलेलें हें सावज;—तूं कोण मधल्यामध्यें शरसंधान करून ही शिकार साधणार? आपल्या प्रेमाची पुतळी आपल्या हातून निसटून गेली असतांना प्रेमी मनुष्य स्वतः दुःखी होतो; प्रेमपात्राचा भंग करणाऱ्या क्रोधाचा संचार तसल्या

दुधखुळ्यांच्या मनांत कधींहि होत नाहीं; पण प्रेमध्वजा, माझ्यासारख्या कर्त्या पुरुषाच्या कामेच्छेवर जर कोणी बिब्वा घातला तर तो क्रोधाला तेव्हांच चढतो, आणि क्रोधाग्नीनें, प्रथम आपला प्रतिस्पर्धी आणि नंतर प्रसंग पडल्यास प्रीतीची प्रतिमा, या दोघांनाहि जाळण्यास तो मागेंपुढें पाहात नाहीं !—तुझ्या सुखाच्या आड कोण येणार आहे ? हं ! हं ! कोण येणार आहे ? हा बुद्धिसिंग येणार आहे ? इतकेंच नव्हे तर आला आहे.

[ जातो.

## अंक पहिला समाप्त.



# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

( पद्मावतीचा तंबू. पद्मावती प्रवेश करिते )

**पद्मा०**:—आमच्या वहिनीला कांहींच समजत नाहीं. दादा तिकडे तसा आजारी पडलेला, त्याच्या औषधपाण्याकडे विशेष लक्ष पुरविण्याचें एका बाजूसच राहिलें, उलट ती बुद्धिसिंगाला बोलावून आणून मीं प्रेमध्वजाच्या हातांत देवीच्या देवळांत हार कसा टाकला याचीच हकीकत सांगत बसते ! किती मीं वहिनीला सांगितलें, कांहीं झालें तरी मी बुद्धिसिंगाशीं लग्न करणार नाहीं. तरी पुनः पुनः आपला हेका आहेच. दादाच्या या आजारी-पणामुळें त्याच्याहि मनाचा कल थोडासा वहिनीच्या बाजूचा होण्याचा संभव आहे. आपण आजारी पडलेलों, आणि इतर रजपूत राजे तर आपल्याला पाण्यांत पाहतात, तेव्हां या धर्मयुद्धाचें काय होईल याची त्याला एकसारखी काळजी लागून राहिली आहे. रजपूत राजमंडळाचें प्रेम स्वीकारण्याकरितां अशा प्रसंगीं बुद्धिसिंगाला मला देऊन टाकायला दादा चुकणार नाहीं, अशी मला भीति वाटत आहे. वहिनीचें सगळें कारस्थान आतांशा असेंच आहे. प्रेमध्वजाच्या हातांत हार टाकून मीं त्याच्या वरचें माझें प्रेम मुद्दाम म्हणून व्यक्त केलें, तेवढ्यावरून तरी तिला समजायला पाहिजे होतें; आणि ही बुद्धिसिंगाची ब्याद—काय करावें वहिनीला, माझीं आर्जवें करण्याकरतां त्याला पुनः तिनें माझ्याकडे पाठवून दिलें !

[ बुद्धिसिंग येतो.

**बुद्धि०**:—आपलें दर्शन घेण्याकरितां मुद्दाम म्हणून मी आलों आहें.

पद्मा०:—आपलें दर्शन मला न देतां माझें दर्शन घेण्याची आपल्याला माझी ना नाहीं, हें पूर्वी पुष्कळ वेळां आपल्याला सुचविलें आहे.

बुद्धि०:—माझ्या दर्शनासाठीं तूं फारशी उत्सुक नाहींस; पण पद्मावती, तुझ्यावर सांप्रत कोणचा प्रसंग आहे हें जर तूं नीट ओळखलेंस तर माझ्या विषयींची तुझ्या मनांतली आढी निघून गेल्यावांचून रहाणार नाहीं.

पद्मा०:—कोणचा प्रसंग आहे? तुमचें तोंड पाहण्याच्या प्रसंगाहून कोणचें अधिक दुर्धर दुःख माझ्यावर आलें आहे, सांगा पाहूं?

बुद्धि०:—या रजपूत राजाचा हात जर तूं आपखुषीनें धरला नाहींस तर एखाद्या मुसलमानाच्या जनानखान्यांत तुला सारें आयुष्य कंठावें लागेल. पद्मावती, मला अत्यंत वाईट वाटतें तें या स्थितीबद्दल. महाराणा प्रतापसिंहानें आपली बहीण मला तरी दिली पाहिजे किंवा शहाच्या जनानखान्यांत तरी पोहोंचविली पाहिजे; या शिवाय मानखंडना टाळण्यास त्याला मार्ग नाहीं.

पद्मा०:—माझा दादा त्या दोन्ही गोष्टी करणार नाहीं.

बुद्धि०:—पद्मावती, हा प्रश्न स्वेच्छेचा नसून परेच्छेचा आहे. पद्मावती, माझ्या शिवाय इतर कोणाहि रजपुताशीं तुझें लग्न झाल्यानें जर अकबरशहाच्या जनानखान्यांत जाण्याचें तुझ्या नशिबीचें टळणारें असेल, तर माझें दुःख निमूटपणें सोसून ईश्वरभजनांत मीं पुढील आयुष्य कंठीन; पण सांप्रत विलक्षण कचाटयांत उदेपूरचें राजघराणें सांपडलेलें आहे. या तापाच्या साथीनें रजपूत सैन्य नाउमेद झालेलें, स्वतः राणाजी त्याच आजारानें अंथरुणाला खिळलेले, मग इतर सर्व रजपूत राजे मी उदास होऊन घरीं बसल्यावर रणांगणाकडे पाठ फिरविल्यावांचून कसे राहतील? पद्मावती, तूंच पाहा, मुसलमानांच्या जनानखान्यांत तूं बटकीप्रमाणें राबणें किंवा न राबणें, हें माझ्या मनाच्या खिन्नतेवर किंवा उल्हासावर आतां

अवलंबून आहे. माझ्या या हाताचा आश्रय घेण्याचें तूं नाकबूल कर, अंगाला राख फासून एखाद्या साधूच्या मठाचा रस्ता या तुझ्या दीन दासानें पकडलाच म्हणून समज. अशा रीतीनें मी बैरागी होऊन मठवासी झाल्यावर माझी इच्छा नसतांहि सर्व रजपूत राजे परस्पर तुझ्या दादाची संमति न घेतां अकबरशहाशीं एकदम तह करतील. पद्मावती, तह करतील इतकेंच नव्हे तर मी बैराग्याची दीक्षा घेण्यापूर्वीच सर्व रजपूत राजांनीं, माझ्या शिवाय—तुझ्या या एकट्या बुद्धिसिंगाशिवाय—सर्व रजपूत राजांनीं, अकबरशहाशीं तहाचें बोलणें लावलें आहे; आणि तें कोणत्या अटीवर ?

**पद्मा०:**—कोणत्या अटीवर ?

**बुद्धि०:**—शहानें प्रयाग तीर्थ सोडून द्यावें आणि सर्व राजांनीं मिळून—जरूर पडल्यास तुझ्या भावाशीं लढूनहि—पद्मावतीचा नजराणा त्याला अर्पण करावा. पद्मावती, मी जो आतां येथें आलों आहे तो तुला एवढेंच कळविण्याकरितां कीं, राजमंडळाच्या अटी शहानें कबूल केल्या आहेत. पद्मावती, रजपुतांच्या अब्रूची जर तुला मजप्रमाणेंच चाड असेल, आपल्या हिंदुधर्माबद्दल जर तुला मजप्रमाणेंच अभिमान वाटत असेल, मुसलमानांच्या जनानखान्यांतील विलासाविषयीं तुझ्या मनांत जर खरोखर आवड नसेल, तर तूं या बुद्धिसिंगाला दूर लोटणार नाहींस. बोल, पद्मावती, बोल. रजपुतांचा पुढारी हा बुद्धिसिंग तुझा हात धरूं दे कीं रजपुतांचा वैरी तो अकबर तुझें पाणीग्रहण करूं दे.

[ तिचा हात धरावयास जातो; पद्मावती दूर जाते. ]

**पद्मा०:**—बुद्धिसिंगजी, दूर व्हा, दूर व्हा; तुमचीं हीं मायावी भाषणें मला समजतात.—अकबरशहाशीं तुम्हीं, बुद्धिसिंगजी, तुम्हीं हें तहाचें बोलणें लावलें आहे. विश्वास दाखवून केसानें गळा कापूं पाहणाऱ्या रजपूत कसाबानें माझा देह भ्रष्ट करण्यापेक्षां, मजकरतां उघड उघड युद्ध करून

बलात्कार करूं पाहणाऱ्या त्या शहाच्या दांडगाईमुळें मला आत्महत्या करावी लागली तरी तें मला अधिक प्रिय आहे. आम्हीं या धर्मयुद्धांत मरायलाहि तयार झालों, या लढाईचें यशापयश हें आम्हांला जन्ममरणाइतकेंच महत्त्वाचें वाटतें, एवढयाच गोष्टीचा फायदा घेऊन तुम्हीं आपला डाव साधूं पाहतां काय ? बुद्धिसिंगजी, माझें तुमच्यावर प्रेम नाहीं हें मीं पूर्वी पुष्कळ वेळां तुम्हांला बोलून दाखविलें आहे आणि आजहि पुनः बोलून दाखवितें. माझें तुमच्यावर प्रेम नसतांना जर तुम्ही शहा एका रजपूत राजकन्येला मागणी घालतो हें ऐकून चवताळलां असतां, एखादी रजपूत राजकन्या मुसलमानांच्या जनानखान्यांत कोंडली जाण्यापेक्षां त्या दीन गाईचा उद्धार करण्याकरतां हातावर शिरकमलें घेऊन शत्रूवर चालून जाणाऱ्या शूर रजपूतांचा पुढाकार जर तुम्हीं स्वीकारला असता, तर बुद्धिसिंगजी, माझ्या प्रेमाचा विषयहि एका बाजूला सारून, वहिनीच्या किंवा दादाच्या शब्दाला मान देण्याकरतां, वीर पुरुषाच्या कर्तबगारीची अंशतः तरी फेड व्हावी म्हणून, लग्नाच्या सहवासानें माझ्या स्वतःच्या सुखाची जरी नाहीं तरी तुमच्या सुखाची काळजी वाहणें हें मला वाईट वाटलें नसतें. पण ज्या प्रसंगीं तुम्हीहि धर्म जाणीत नाहीं, तुम्हींहि अभिमान विसरून जातां, त्या प्रसंगीं मी तरी धर्मप्रेमाच्या पोकळ शब्दांच्या जाळ्यांत सांपडून माझ्या सुखाचें मातेरें कां करून घेऊं ? तुमच्यासारख्या कसाबांच्या हातून आमच्या धर्माचें रक्षण होण्याऐवजीं आमचा धर्म अधोगतीलाच लागेल यांत संशय नाहीं. तुम्हींच आपला धर्म पायाखालीं लाथाडतां आहां. आणि मी जर तुमची सहधर्मचारिणी झालें तर तुमच्याबरोबरच धर्माला लाथाडण्याचें काम मला करावें लागेल. जा, बुद्धिसिंगजी जा. ही मानी पद्मावती स्वतःच्या धर्माला लाथाडण्यापेक्षां तुम्हांलाच लाथाडण्यास तयार आहे. दादा तुमच्या बाजूचा होऊं दे, वहिनी तुमच्या बाजूची असूं दे, शहाचें सैन्य तुमच्या बाजूचें असूं दे, ही

मानी पद्मावती तुमचा आज उघड उघड धिःक्कार करीत आहे. आणि मी पुन्हां तुम्हांला आतां बजावून सांगतें, पद्मावतीचा देह माझ्या मनानें दुसऱ्याला अर्पण केलेला असून माझ्याशीं प्रेमाच्या गोष्टी बोलण्यास जर तुम्ही पुनः याल तर माझ्याऐवजीं माझ्या प्रियकराच्या तलवारीचीच गांठ पडल्यावांचून राहणार नाहीं.

[ जाते.

बुद्धि०:—मोगलांच्या छावणींतलें सांर्थाच्या तापावरचें औषध प्रेमध्वजाचे हातीं लागल्यामुळें हिच्या घमेंडीची कमान अधिक चढती झाल्यासारखी दिसते ! पद्मावती, तुला काय ठाऊक आहे, या बुद्धिसिंगानें त्या औषधांत नाहीं तरी त्या औषधासंबंधानें राणीच्या मनांत केव्हांच संशयाचें विष कालविलें आहे ! आतां मी स्वतः जाऊन प्रतापसिंहाचे मनांत भरवून देतों, रजपूत राजमंडळाचा कोंडमारा होऊन पद्मावती मिळावी म्हणून मोंगलांनीं औषधाचे ऐवजीं विषच पाठवून दिलेलें असलें पाहिजे.

[ पडदा.

---

## प्रवेश दुसरा.

( प्रतापसिंहाचा तंबू. प्रतापसिंह आंथरुणावर पडला आहे व राणी जवळ आहे. )

राणी०:—मला प्रथम वाटलें होतें कीं त्या हकिमाचें औषध घ्यायला कांहीं हरकत नाहीं म्हणून; पण बुद्धिसिंगजींनीं सांगितलेली हकीकत ऐकून मला बाई भयच वाटूं लागलें आहे. मुसलमानांच्या छावणींतील हे हकीम म्हणे फार कपटी असतात. तेव्हां म्हणतें, औषध घेण्याचा बेत तहकूब ठेवावा

प्रता०:—मी आजपर्यंत कोणाशीं कपटानें वागलों नाहीं माझ्या हाडवैऱ्याला

देखील कपटानें जिंकावें अशी दुर्बुद्धि मला स्वप्नांतहि कधीं शिवली नाहीं; म्हणून लाडके, मी तुला सांगतों, कपटाच्या विषप्रयोगाचा माझ्यावर कांहींहि वाईट परिणाम होणार नाहीं. माझें मन मला सांगतें आहे, हा हकीम कपटी नसून माझ्या दुखण्याच्या यातनांतून मला सोडविण्याकरितां परमेश्वर एकलिंगजीनेंच त्याला मजकडे पाठविलें आहे.

**राणी०:**—पण मी म्हणतें, जिथें संशय आला तिथें उगीच अंधारांत उडी घेण्यांत कोणता पुरुषार्थ आहे? तो हकीम कदाचित् चांगल्या हेतूनेंहि औषध देणार असेल, पण स्वतःच्या मनाशीं वैर करून याचें औषध घेण्याची—

**प्रता०:**—नाहीं. माझ्या हातून या तापाच्या वेदना सोसवत नाहींत. याहि वेदना सोसल्या असत्या पण काय करूं? ज्या वेळीं रजपुताची समशेर रणांगणावर शत्रूचा संहार करण्यांत गुंतलेली असायची त्या वेळीं माझ्या या अशा आजारीपणामुळें तिला मी म्यानाच्या पांघरुणाखालीं दडपून कशी ठेवूं? आंथरुणाला खिळून मी महिनान् महिना राहीन, पण माझी ती तलवार म्यानांत खिळून या वेळीं कशी गप्प बसेल? तिच्या हातून हा म्यानाचा कैदखाना कसा सोसवेल? माझ्या शरीराच्या यातनांचा विचार केला नाहीं तरी त्या म्यानाच्या पांघरुणाच्या आंत त्या समशेरीच्या चाललेल्या वेदनांकडे मला लक्ष द्यायला नको का? ती पाहा, ती म्हणते आहे रजपुतांशीं कपटानें वागणाऱ्यांचा संहार करण्यांत जर मीं आजपर्यंत कसूर केलेली नाहीं तर आजच तुम्हांला कपटाची इतकी धास्ती कां वाटते? बस्स, मी तें औषध घेणार; मग कांहींहि होवो.

**राणी०:**—आतां थोडया वेळानें बुद्धिसिंगजी येणार आहेत; त्यांचें बोलणें ऐकून घेण्यापूर्वी तरी निदान कोणताच निश्चय करूं नये. [पद्मावती येते.

**पद्मा०:**—औषध घेण्याच्या कामीं बुद्धिसिंगजींचा सल्ला कशाला घ्यायला

पाहिजे ? त्या औषधाच्या गुणाबद्दल सर्व मोंगलांच्या छावणींत एकसारखी तारीफ चालू आहे. तेव्हां म्हणतें, दादा, असलें हें औषध आपल्या पायानें जर आमच्या छावणींत चालत येत आहे तर त्याचा अव्हेर करणें चांगलें होईल का ? शिवाय प्रेमध्वजहि म्हणत होते—

**राणी०:**—वत्सं, तुम्ही त्या औषधाची एवढी तारीफ कां करतां तें आतां माझ्या ध्यानांत आलें. प्रेमध्वजाच्या शौर्यावर भुलून ती जडीबुट्टी रजपुतांकडे धांवत आली, एवढ्याचसाठीं तिला गुणकारी समजायचें ना ? पण पहा हो बाई ! त्या औषधाला जर इकडून नसतें महत्त्व देण्यांत आलें तर तुमच्याऐवजीं त्या जडीबुट्टीवरच प्रेमध्वजाचें अधिक लक्ष बसल्यावांचून राहणार नाहीं.

**पद्मा०:**—वहिनी, दादा असा आजारी असतांना दादाच्यापुढें हीं बोलणीं तुला सुचतात तरी कशीं ?

**प्रता०:**—दुसऱ्या कोणत्याहि कारणाकरितां नाहीं तरी प्रेमध्वजाच्या खटपटीमुळें या औषधाचा लाभ मला होतो आहे, एवढ्या एकाच कारणाकरितां मी हें औषध घेणार. निष्कपट चेहऱ्याचा, निष्कपट शब्दाचा, निष्कपट कृतीचा प्रेमध्वजाइतका माणूस मीं आजपर्यंत पाहिला नाहीं. त्यानें आणलेल्या औषधांत कपट असणें शक्य नाहीं.

**राणी०:**—पण बुद्धिसिंगजी म्हणत होते, आमच्या छावणींत तें औषध आलेलें नसून कपटाचे मूर्तिमंत डावपेंचच आलेले आहेत.

[ जासूद प्रवेश करतो.

**जासू०:**—आले आहेत महाराज.

**राणी०:**—कोण रे ?

**जासू०:**—बुद्धिसिंगजी आणि गरुडध्वज.

**पद्मा०:**—येऊं दे त्यांना आंत. [ जासूद जातो.

**राणी०**:—बरें झालें. बरे वेळेवर आले. आतां ते स्वतःच सांगतील त्याना असा संशय कां येतो तें. [ बुद्धिसिंग व गरुडध्वज येतात.

**प्रता०**:—या बुद्धिसिंगजी, या. गरुडध्वज, या. मी इतक्या दिवस आजारी आहें पण माझ्या समाचाराला यायला आज आपणांला फावलें ना! सांगा, कोणच्या कारस्थानांत आज आपण इतके दिवस गुंतलां होतां. या धर्मयुद्धाकरतां आलेल्या रजपुतांमध्यें आपल्याइतके मसलती कोणी नाहीं म्हणून आपली ख्याति आहे; तेव्हां सांगा कोणत्या मसलतींत आपण गढून गेलां होतां तें.

**बुद्धि०**:—मसलत कसली! आपण असे आजारी पडलां आहां हें पाहून या धर्मयुद्धाचें काय होणार याची विवंचना सर्व राजांना वाटूं लागली! अकबरशहाशीं निकरानें लढावें तर रजपुतांची मूर्तिमंत तरवार अंथरुणाला खिळून राहिलेली; हे गरुडध्वज तरी लढणार कसे? प्रयाग तीर्थ न सोडतां परत जावें तर रजपुतांच्या अब्रूचा प्रयागास गंगायमुनेबरोबर मिलाफ होऊन त्रिवेणीसंगम झालेला. तेव्हां या कैचींतून सुटण्याच्या मसलतींत इतक्या दिवस हे गुंतले होते. पण राहूं दे ती मसलत एका बाजूला. प्रथम मला असें सांगा, आपल्या प्रकृतीला आतां थोडा तरी आराम पडत चालला आहे ना? आपल्या प्रकृतीला बरें वाटलें म्हणजे पुन्हां युद्धाला सुरवात करण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण गरुडध्वजजींच्या या तहाच्या मसलतीची मला अगदीं कटकट वाटूं लागली आहे.

**प्रता०**:—कोणत्या तहाची?

**बुद्धि०**:—जाऊं द्या त्या गोष्टी. तसल्या गोष्टी दुखण्यांत आपल्या कानावर घालणें इष्ट नाहीं. आपण एकदां बरे झालां म्हणजे—

**प्रता०**:—मी असा आजारी पडलों असतांना माझ्यापरोक्ष अकबरशहाशीं तह करणार कोण? आम्ही रजपूत आपली अब्रू संभाळण्याकरतां या रणभूमीवर प्राप्त झालों कीं तह करण्यासाठीं झालों?

बुद्धि०:—तसें नाहीं. अब्रू सांभाळूनच तह करण्याचा यांचा बेत आहे.

गरु०:—अब्रू संभाळून ज्याप्रमाणें मला यथेच्छ दारू पितां येते, त्याप्रमाणें अब्रू संभाळूनच तहहि करतां येतो.

बुद्धि०:—पण ही तहाची कटकट आपणाला नको. आम्ही येथें आलों आहों ते तहाची वाटाघाट करण्याला कांहीं आलों नाहीं, आपल्या समाचाराला आलों आहों. आपल्या छावणींतल्या सर्व राजवैद्यांचें तर असें म्हणणें पडतें आहे कीं, इतके दिवस ज्याअर्थी या तापाला आपण दाद दिली नाहीं त्याअर्थी आपणास भीति उरली नाहीं. अशक्तता आहे–हो फारच आहे– आणि राजवैद्यांच्या सांगण्यावरून आम्ही मुद्दाम भेटीस इतके दिवस आलों नाहीं. हो, इथें आलों म्हणजे साहजिकच तहाच्या गोष्टी निघायच्या आणि कदाचित् दुखणें विकोपास जायचें.

पद्मा०:—पण ती तहाची वाटाघाट पुनः पुनः कशाला पुढें आणतां. मी म्हणतें आतां तो हकीम येईपर्यंत दादाला थोडा वेळ स्वस्थपणानें पडून राहूं द्या. त्या हकिमाच्या औषधानें दोन तीन दिवसांतच दादा बरा होईल. तह करायचा कीं लढाई करायची याची वाटाघाट मग केली तर नाहीं का चालायची ? ( ‘असें इकडून यावें हकीमसाहेब’ असा पडद्यांत गलबला होतो. ) त्या हकिमाचीच स्वारी येत आहेसें वाटतें. प्रेमध्वजहि बरोबर असतील. दादा, मी त्यांना आंत घेऊन येतें.–हें पहा, उगीच तहाच्या गोष्टी बोलून दादाच्या मनाला त्रास देऊं नका. [ जाते.

बुद्धि०:—तहाच्यासंबंधानें एक अक्षरसुद्धां इथें बोलतां कामा नये.

राणी०:—त्या हकिमाचें औषध कां घेऊं नये तें सांगायला कोणती हरकत आहे ?

गरु०:—सांथीच्या तापावर औषध माझ्याजवळ आहे; हकिमाचें औषध कशाला ? मदिरापानाला लोक खुशाल नांवें ठेवोत पण सांथीच्या तापावर—

**राणी०:**—मी विचारतें आहें, हकिमाबद्दल संशय घेण्याचीं कारणें कोणतीं ?

**बुद्धि०:**—त्याच मुद्यावर राणीसाहेब मी आतां येतों आहें. तहाच्या वाटाघाटींत असें बाहेर पडलें, ताईसाहेबांनीं जर मनावर घेतलें तर लढाई न करतां देखील प्रयाग तीर्थ मुसलमानांच्या तावडींतून आज सुटणार आहे. पद्मावती ताईसाहेब जर अकबरशहाच्या राणी झाल्या तर—

**प्रता०:**—आणि असल्या तहाची वाटाघाट तुम्ही इतके दिवस करीत बसलां होतां वाटतें ! मी आजारी पडलों आहें म्हणजे मी कांहीं मेलों नाहीं.

**बुद्धि०:**—आणखी आम्ही तरी असला तह करूं असें आपल्याला वाटतें तरी कसें ? मला सुचवायचें आहे ते याच्यापुढेंच आहे. आम्हांला असला तह मान्य होणार नाहीं, व आपणालाहि असला तह मान्य होणार नाहीं; अकबरशहा हें पक्कें जाणून आहे. पण आपल्या आजारीपणामुळें पद्मावतीसंबंधानें त्याच्या तोंडाला पाणी सुटूं लागलें आहे. रजपुतांचें मूर्तिमंत शौर्य जर आजारी, तर रजपूत बायकांच्या अब्रूचें रक्षण तरी कोणी करायचें ? आपल्या आजारीपणाचे दिवस जसजसे लांबत चालले आहेत तसतसे पद्मावतीच्या तंबूंत शिरून तिचें पाणिग्रहण करण्याइतका अकबराचा हातहि लांबत चालला आहे. राणाजी, मी स्पष्ट बोलतों, आपलें शौर्य कांहीं आमच्या अंगांत नाहीं; आणि आपण जर रणांगणावर नाहीं तर अकबरशहा व पद्मावती यांच्यामध्यें आमच्या ढाली यत्किंचित्हि टिकाव धरणार नाहींत; मग अकबरशहाला कां वाटूं नये पद्मावती आपल्याला मिळाल्यासारखी आहे म्हणून. आपले हेतु अनायासें साधण्याचा असा योग आला असतांना राणाजींना द्यावयाच्या औषधाच्या गोळ्यांवर विषारी कपटाचीं पुटें दिल्यावांचून अकबरशहा कसा राहील ?

**राणी०:**—आणि म्हणून मी म्हणतें, या हकिमाचें औषध घेऊन

बन्सुंना मुसलमानांच्या जनानखान्यांत आपण होऊन पाठविण्याचें पातक आपण आपल्या माथीं घेऊं नये.

**बुद्धि०:**—तसा म्हणजे त्यांत मोठा धोका आहे अशांतला भाग नव्हे. पण असेंच कित्येक महिने जर आपल्याला आंथरुणावर खितपत पडावें लागलें, किंवा या दुखण्यांत आमच्या सर्वांच्या दुर्दैवानें आपलें कांहीं बरेंवाईट झालें, तर अकबरशहाचे हेतू तेव्हांच तडीस जाणार आहेत; हें विसरतां कामा नये.

**गरू०:**—त्या मोंगलांच्या औषधांत कपटच असलें पाहिजे. शिवाय मी म्हणतों सांथीच्या तापावर मोंगलाकडचें औषध कशाला आणलें?—नका, बोलतांना मला मध्येंच अडवूं नका, मला स्पष्ट स्पष्ट बोलूं द्या,—तुमच्या सर्वांच्या छावणींत सांथीचा ताप आहे; पण माझ्या छावणींत दारूशिवाय इतर कोणच्याहि कारणानें कोणी मेलेला मी आजपर्यंत ऐकलेलें नाहीं. प्रतापसिंहजी, तुम्हाला वाईट वाटेल, पण मी स्पष्ट सांगतों, हकीमाचें औषध घेण्याऐवजीं मजप्रमाणें बेताबेतानें दारू पिण्याची संवय लावून घ्या, म्हणजे इतर दुसरा कोणचाहि रोग तुम्हांला होणार नाहीं. दारूच्या पिंपांत बुडून बसलें म्हणजे रोगांची नजर तेव्हांच चुकवितां येते. पिता का थोडी थोडी? पाठवून देऊं का माझ्या छावणींतलें औषध?

(पद्मावती, प्रेमध्वज व हकीम येतात.)

**प्रेम०:**—महाराज, हेच ते हकीम. यांच्या औषधाबद्दल सरकारच्या कानावर सर्व गोष्टी मीं पूर्वी घातल्याच आहेत.

**बुद्धि०:**—हकीमजी, आपण कोणाच्या छावणींत, कोणापुढें उभे आहां हें आपणास माहीत आहे ना? महाराणाजींना जर आपल्याला औषध द्यावयाचें असेल तर आपल्या औषधाची परीक्षा प्रथम आमच्या राजवैद्यांकडून झाली पाहिजे; आणि नंतरच तें औषध आम्ही महाराणाजींना घेऊन देऊं.

हकी०:—माझी ना नाहीं. ही जडीबुट्टी आपल्या राजवैद्यांना समजावून देण्याला मी तयार आहें. मुसलमानांच्या व हिंदूंच्या दोन्ही प्रदेशांवर सारखाच पाऊस पाडून जर परमेश्वर दोघांचाहि चरितार्थ चालवितो, तर त्याच पावसामुळें उत्पन्न झालेली ही वनौषधी दोघांच्याहि सारखीच कां उपयोगीं पडूं नये ? परमेश्वरानें दोघांच्याहिकरितां ही वनौषधी तयार केलेली आहे. बोलवा, आपले कोण राजवैद्य असतील ते बोलवा. त्यांना मी सर्व कांहीं समजावून सांगतों. होऊं द्या या औषधाची त्यांच्याकडून परीक्षा; अलबत् होऊं द्या.

प्रेम०:—नाहीं, याची परीक्षा करण्याची बिलकूल जरुरी नाहीं. ज्या अमिरानें अकबरशहाकडून या हकिमाला पाठवून दिलें तो अमीर सच्चा शूर पुरुष असल्याबद्दल माझी खात्री आहे. आणि महाराजांना हें सांगायला नको, मित्रेपणाइतकेंच कपटाशींहि शूरपणाचें वैर असतें.

प्रता०:—शूर पुरुषानें पाठविलेलें हें औषध आहे; प्रेमध्वज, तुमच्या-सारख्या वीरानें हें औषध या छावणींत आणलेलें आहे; बस्स झाली त्याची इतकी तरफदारी. हकीमजी, द्या, तें औषध मला द्या. आपलें औषध न घेणें म्हणजे शौर्याला बेईमानी समजण्यासारखें आहे.

बुद्धि०:—हकीमजी, हें पक्कें लक्षांत ठेवा, या औषधामुळें जर महा-राण्यांच्या प्रकृतींत किंचित्हि अधिक बिघाड झाला, तर आपल्या अंगावरच्या कातड्याच्या पोत्यांत भरलेली आपल्या हाडांची पूड आमच्या छावणींतल्या मस्त हत्तीचे पाय आपल्या घरीं नेऊन पोंचविण्यास चुकणार नाहींत.

हकी०:—या गोष्टीलाहि माझी ना नाहीं. पण हें पक्कें लक्षांत ठेवा, आपण सांगतां त्याप्रमाणें मुसलमानांच्या छावणीकडे जाण्याचा प्रसंग मजवर यायचा नसून, उदेपूरच्या राजघराण्यांतील महाराण्याच्या खास हत्तीवरील अंबारींत बसवून, हें औषध घेतल्यानंतर, महाराणा माझ्या घरीं मला पोंचते करतील.

**प्रता०:**—हो, असेंच होईल.—द्या मला तें औषध.

**गरु०:**—थांबा हकीमजी, प्रथम मला असें सांगा, मोंगलांच्या छावणींतले लोक सर्रास दारू पितात म्हणून तेथें हा सांथीचा ताप इतका फैलावला नाहीं, हें खरें आहे ना ?

**हकी०:**—कोण म्हणतो मोंगलांच्या छावणींतले लोक सर्रास दारू पितात म्हणून ? रणांगणावर दारू पिणाराची गर्दन छाटून टाकावी, असा अकबरशहाचा सक्त हुकूम आहे.

**गरु०:**—जर दारू पीत नाहींत तर ते तापानें अद्याप कसे मेले नाहींत ? माझी तर पक्की खात्री आहे, माझ्यासारखा प्रत्येक निरोगी मनुष्य दारूबाज असतो.

**प्रता०:**—दारूच्या क्षयरोगानें आपलें बिऱ्हाड शरीरांत ठेवल्यावर इतर रोगांना थारा कोठें मिळणार ?—हकीमजी, द्या मला तें औषध, द्या.

**हकी०:**—प्रेमध्वज, औषधाच्या या तीन पुड्या आहेत. पहिली पुडी आतां पाण्यांतून द्या; दुसरी पुडी आणखी सात दिवसांनीं द्या; आणि तिसरी पंधराव्या दिवशीं द्या. पंधराव्या दिवशीं महाराणाजी पूर्वीप्रमाणें वज्रदेही झालेले पाहायला मी रजपुतांच्या छावणींत पुनः येईन.

**बुद्धि०:**—राणाजी, इतक्या घाईनें औषध घेण्याचें कारण नाहीं. सर्व राजवैद्यांकडून या औषधाची परीक्षा करावी, आणि मग खुशाल हें औषध घ्यावें.

**प्रता०:**—द्या तुमचें औषध; मीच करितों त्याची परीक्षा. (पेला हातांत घेऊन) हकीमजी, मला आजारी मनुष्याची नाडी समजत नाहीं; पण धडधाकट्या मनुष्याची नाडी चांगली समजते. तुमचा हा हात पुढें करा. हें औषध घेण्यापूर्वी माझी नाडी आपण पाहण्याऐवजीं मला आपली नाडी पाहिली पाहिजे. ( हकीम हात पुढें करतो. त्याची नाडी पाहून ) पहा, बुद्धिसिंगजी पहा. कपटी मनुष्याची नाडी अशी वाहत नसते. मनाची शीतवृत्ति कपटानें अशी कधींहि राहावयाची नाहीं. पहा, ही नाडी पहा,

कपटाच्या हृदयांतून निघालेलें रक्त या नाडींत वाहत आहे असें तुम्हांला वाटतें का ? चोहोंकडून शत्रूच्या माऱ्यांत एकटा सांपडला असतांनाहि खऱ्या शूर पुरुषाची नाडी जशी शांतपणानें वाहात असते तशी या हकिमाची या वेळीं वाहात आहे. बुद्धिसिंगजी, कोणी दुस्मानानें या पेल्यांत जरी विष टाकलेलें असलें तरी असल्या शांत व उदार हृदयाचा सहवास त्या विषाला झाला असल्यामुळें तें विष माझ्या पोटांत अमृतासारखेंच गुणकारी होईल. [ औषध घेतो व झोंपीं जातो.

**हकी०**:—यांना थोडा वेळ अशीच झोंप लागेल, आणि ते सावध झाल्यावर हा सांथीचा ताप त्यांच्या अंगांत बिल्कुल राहाणार नाहीं. चला, आपण दुसरीकडे जाऊं. त्यांना एकट्यांनाच थोडा वेळ शांतपणें झोंप घेऊं द्या.

( बुद्धिसिंग व गरुडध्वज यांशिवाय इतर सर्व जातात. )

**बुद्धि०**:—अखेर यानें तें औषध घेतलेंच अं ! नसतें घेतलें तर बरें झालें असतें.

**गरु०**:—औषध घेतलें इतकें नव्हे तर दारूबाज क्षयरोगी असतात, असें म्हणाला ! मला स्वतःला कोणी नांवें ठेविलीं तर तें एक वेळ चालेल, पण दारूबाजांची निंदा आपल्याच्यानें नाहीं ऐकवत. चला, या बुद्धिसिंगजी, या प्रतापसिंहाची खोड मोडण्याची कांहीं तरी युक्ति मला सांगा, चला. [ जातो.

**बुद्धि०**:—मीही त्याच विचारांत आहें. या औषधाच्या पेल्यांत मला विष टाकतां आलें नाहीं तरी प्रतापसिंहा, पक्कें लक्षांत ठेव, या औषधाच्या गुणानें रोगाच्या जाळ्यांतून जों तूं सुटशील तोंच या बुद्धिसिंगाच्या मसलतीच्या जाळ्यांत तूं गुरफटला जाशील. रोगामुळें तुझें मनगट जरी निर्बल झालें नाहीं तरी रजपूत राजांतील दुहीनें तुझी तलवार मी बोथट करीन. आणखी अखेर या बुद्धिसिंगाचीं आर्जवें करून, पद्मावतीच्या नजराण्यानें या बुद्धिसिंगाला खूप करूनच, तुला तुझी अब्रू सांभाळावी लागेल. [ जातो.

——

## प्रवेश तिसरा.

---

**स्थळः**—गरुडध्वजाच्या तंबूपुढलें पटांगण.

**क्षय०**:—( मद्याचीं कांचपात्रें घेऊन दारू पीत पीत प्रवेश करून ) बरें झालें. अमरनाथ साधूची आणि आमची ताटातूट झाली, बरें झालें. तो आपल्याला अमरनाथ म्हणवतो, पण हें असलें अमृत एक दिवससुद्धां त्या अमऱ्याच्या घरीं मला प्यायला मिळालें नाहीं ( दारू पितो. ) प्रेमध्वजाच्या स्वाधीन त्यानें मला केलें त्या वेळीं मला वाटलें कीं, प्रेमाला जाळण्याकरतांच महाकालाप्रमाणें या क्षयाची योजना झालेली आहे. पण तो प्रेमाचा ध्वज कसला वस्ताद ! त्यानें वृद्धीला पद्मावती ताईसाहेबांना भेट म्हणून देऊन टाकली आणि हा अपशकुनी क्षय स्वतःजवळ नको म्हणून, एखाद्या पोळाप्रमाणें मला या रजपुतांच्या छावणींत त्यानें सोडून दिलें. बरें झालें, या गरुडध्वज महाराजांचें मंदिर लवकरच आमच्या दृष्टीस पडलें. लगेच त्यांच्या देवडीवर आम्हीं आमची बैठक घातली. असल्या अमृताचा आस्वाद घेणारा धनी मिळाल्यावर कोण त्याच्या तैनातीला आपखुर्षीनें राहणार नाहीं ? हें अमृत असें ( पितो ) पीत राहिल्यानें मला वाटूं लागलें आहे कीं सगळ्या विश्वाची वृद्धि होते आहे,—सर्व विश्व व्यापून हा क्षय असा दहा हाडकें कसा शिल्लक राहिला ?—या मद्यांत वृद्धि, या पेल्यांत वृद्धि, माझ्या तोंडांत वृद्धि, माझ्या पोटांत वृद्धि, माझ्या हातांत वृद्धि ( वृद्धि प्रवेश करते ) या बाजूला वृद्धि, त्या बाजूला वृद्धि ( पाहून ) अंः ! आणि ही खरोखरच वृद्धि ! मला तूं खरें खरें सांग, या मद्यांत तूं इतका वेळ मिसळून राहिली असतांना यांतून एकदम कशी बाहेर पडलीस ?

**वृद्धि०**:—देव करो आणि मद्याची वृद्धि तुमच्या तोंडांत अशीच होवो एरवीं क्षयाचा नाश कसा होईल ?

**क्षय०:**—या क्षयाचा नाश व्हायचा नाहीं, तर मी क्षयच सर्वांचा नाश करणार. आणि या कामीं तुझ्यापेक्षां मला या मदिरेचाच जास्त उपयोग आहे. घे, वृद्धि, घे ही मदिरा, पहा तर कशी आहे ती. तुझ्या या सवतीवर मी जो इतका दंग झालों आहें, तिची लज्जत तरी पाहा. क्षयाला हीच अर्धांगी शोभते. आज सकाळपासून हिनें काय धुमाकूळ उडवून दिला आहे! पहा, घे थोडी; हिचा—मदिरेचा—प्रताप तरी समजून येईल तुला.

**वृद्धि०:**—या मदिरेनें प्रत्येक विचाराची, विकाराची व कृतीची वाढ झाल्यासारखी वाटते; आणि ही माझी सख्खी बहीण आहे असें समजून तुमच्यासारखे क्षयी पुरुष तिच्या नादीं लागतात. पण क्षयाचा अंत मदिरेनें होतो किंवा मदिरेचा अंत क्षयानें होतो; तेव्हां तुम्हां दोघांची जोडी चांगली शोभते. मला तिचें रूप पाहावयाला नको, गंध घ्यायला नको, किंवा रसहि चाखायला नको. बरें केलें कीं प्रेमध्वजांनीं मला पद्मावती ताईसाहेबांच्या पदरीं टाकलें. त्या दोघांची वृद्धि कशी होईल एवढ्याच विचारांत मी आजकाल सुख मानतें. या सवतीच्या नादाला लागून आपण माझ्याकडे पाहीनासे झालां म्हणजे मी खरोखरच स्वतःला भाग्यवान समजेन.

**क्षय०:**—समज, आणखी खंडीभर भाग्यवान् समज. आपण तर या मदिरेला एक क्षणभरहि दूर करणार नाहीं. पद्मावती बाईसाहेबांचा आश्रय मिळाला म्हणून तुला घमेंड वाटते होय? आतां क्षय नकोसा वाटूं लागला होय? प्रतापसिंहाच्या आश्रयाला आहेस; पण मीहि गरुडाच्या आश्रयाला आहें. प्रत्येक घोटानिशीं (पितो) पंख फुटून गरुडाप्रमाणें आकाशांत मी भराऱ्या मारतों आहें असें मला वाटतें. आणि वृद्धि, तूं मुकाट्यानें माझ्याशीं गोडी-गुलाबीनें वाग. नाहीं तर बघ चालला हा गरुड आकाशांत. चालला भराऱ्या मारीत आकाशांत. हें बघ, वरून तुला एकदम खालीं सोडून देईन, आणि मग झडप घालीन. हें बघ, असा–असा–चाललों; असा चाललों बघ, अशी

तुला चोंचींत धरून (पेला दातांनीं धरून) अशी बघ–अशी बघ–अशी एकदम खालीं सोडून देईन. (सोडून देतो तों पेला फुटतो) पाहिलेंस–पाहिलेंस–अस्सा तुझा चक्काचूर होईल.

**वृद्धि०:**—असल्या क्षयाच्या हातून ही अशीच कामगिरी व्हायची. घरच्या बायकोच्या अंगावर वस्सदिशी ओरडावें, किंवा एखादें कांचेचें भांडें कांहीं तरी नादांत असें फोडावें; याहून दुसरेंतिसरें क्षयाच्या हातून काय होणार ?

**क्षय०:**—तोंड आटपून बोल. माझे धनी गरुडध्वज यांच्या निशाणावर गरुड आहे; म्हणजे मी स्वत: आहें; मी आतां गरुड आहें; समजलीस का ? मी आतां गरुड आहें म्हणजे मी आतां माझ्या धन्याच्या निशाणावर आहें किंवा माझें निशाण धन्याजवळ आहे. माझें निशाण आहे म्हणून माझ्या धन्याला गरुडध्वज म्हणतात; अर्थात् माझ्यामुळें गरुडध्वजाला धनीपणा प्राप्त झाला आहे; म्हणजे मीच गरुडध्वजाचा धनी आहें. माझ्या एवढा मोठा सबंध जगांत दुसरा कोणी नाहीं, मी गरुडध्वजाहून मोठा, मी प्रतापसिंहाहून मोठा, मी पद्मावतीहून मोठा, मी वृद्धीहून मोठा, तूं आतां कबूल करणार नाहींस, पण एका घटकेच्या आंत कबूल करशील, मी वृद्धीहून मोठा आहें.

**वृद्धि०:**—उदेपूरकरांहून या छावणींत कोणीहि मोठा नाहीं. उदेपूरचे महाराणा प्रतापसिंह यांच्या बहिणीच्या—पद्मावती बाईसाहेबांच्या—पदरीं मी आहें. तुझा मालक गरुडध्वज महाराणा प्रतापसिंहाहून कमी योग्यतेचा आहे; तेव्हां अर्थात् तूं माझ्याहून कमी योग्यतेचा. क्षय कधीं तरी वृद्धीहून अधिक योग्यतेचा होईल का ?

**क्षय०:**—आतां या तुझ्या गमजा एक घटकाभरच. थोड्या वेळापूर्वी आमच्या धनीसाहेबांचे सगळे स्नेही मेजवानीला जमले होते; क्षय तेथेंच

थोडासा गरुड झाला होता; आणि चक्काचूर केलेल्या वृद्धीची लयलूट चालली होती. त्या वेळीं जसें तूं आतां मला टाकून बोललीस त्याप्रमाणेंच सर्वांनीं गरुडध्वजाचें गरुडाचें निशाण उदेपूरच्या सिंहाच्या निशाणाहून कमी दर्जाचें अशी आमच्या धनीसाहेबांची थट्टा आरंभिली. या वीराचे ते धनीसाहेब पडले, ते काय मुकाटयानें ऐकून घेतात! (पडद्यांत गलबला) ऐकलास हा गोंगाट? हा ऐक, ऐक, ती पहा, ती पहा, आमच्या धनीसाहेबांची स्वारी इकडेच येत आहे. प्रतापसिंहाहून गरुडध्वज मोठा आहे हें ठरविण्याकरितां, या बटीक वृद्धीहून हा क्षय मोठया दर्जाचा आहे हें सर्वांनीं कबूल करावें म्हणून, तें पहा, गरुडध्वजाचें निशाण—या गरुडाचें निशाण—प्रतापसिंहाच्या निशाणावर झडप घालण्याकरतां, चाललें आहे. चालला हा गरुड उड्डाण करीत, क्षणांत दोन क्षणांत येशील माझ्या पायां पडायला आपोआप. चालला हा गरुड उड्डाण करीत. चालला उड्डाण करीत. [ जातो.

वृद्धि०:—हा मेला क्षय जिथें जाईल तिथें वाटोळें करील. गरुडध्वजाच्या पदरीं राहून दोन दिवस झाले नाहींत तोंच उदेपूरकरांशीं कुरापत काढण्याची अवदसा गरुडध्वजाला आठवली! क्षयाचे पाय घराला लागल्यावर अवदसा कां आठवणार नाहीं? अग बाई, हे सगळे इकडेच यायला लागले! मोठी गर्दी जमत चालली! मला या तंटयाची खबर पहिल्या प्रथम पद्मावती बाईसाहेबांना दिली पाहिजे. [ जाते

(गरुडध्वज, बुद्धिसिंग व गरुडध्वजाचे नोकर निशाणासह येतात)

बुद्धि०:—गरुडध्वज, अविचारानें कोणतीहि गोष्ट करूं नये. कारण अविचाराचा शेवट दुःखांत झाल्यावांचून रहात नाहीं. शिवाय थाटाच्या मेजवानींत मदिरापान यथेच्छ केल्यानंतर तरुण विलासिनींच्या सहवासांत आपल्यासारख्या रंगेल राजांनीं काळ घालवायचा असतो. अशा वेळीं उच्च जागीं निशाण कोणाचें, हलक्या जागीं निशाण कोणाचें, असल्या

राजकारणाच्या भानगडींत जर आपण पडलां, तर आपण आपल्या पायावर धोंड ओढून घेतल्यासारखें नाहीं का होणार ?

**गरु०:**—काय, मला—या गरुडाला—अविचारी म्हणतां ? मी तुम्हांला खात्रीनें सांगतों, जर कोणच्या वेळीं मला उत्तम विचार सुचत असले, मर्दुमकीचा आवेश जर कोणच्या वेळीं माझ्या अंगांत शिरत असला, सत्कृत्य जर कोणच्या वेळीं माझ्या हातून घडत असलें, तर ती वेळ मदिरापानानंतरचीच होय. प्रातःकालाला किंवा सूर्यास्ताच्या समयाला तपस्वी जितका शुभकाल समजतात तितकाच शुभकाल माझ्या पोटांतील मदिरेच्या उदयाचा किंवा माझ्या हातांतील मदिरेच्या अस्ताचा मी समजतों. अशा वेळीं प्रतापसिंहाचें एकट्याचें तें निशाण मुख्य जागीं फडकत राहणें जर मला गैर वाटतें आहे, तर तें तसें असलेंच पाहिजे.

**बुद्धि०:**—मदिरेचा पगडा आपल्या डोळयावर बसला आहे. आपल्या पोटांत ती अस्तास जाऊन चेहऱ्यावर पुनः उदयास येऊं पाहात आहे. अशा वेळीं आपल्या हातून भलतेंसलतें होणार नाहीं हें खरें. पण मी म्हणतों हा अस्तोदय जर अधिक जोराचा झाला तर आपल्या हातून अविचार नाहीं का होणार ? आपल्या पोटावर व आपल्या चेहऱ्यावर मदिरेच्या अस्ताचा किंवा उदयाचा प्रताप दिसतो आहे; पण आपले हातपाय लटपटूं लागले आहेत त्याला कसें करायचें ? अशा स्थितींत आपल्या हाताच्याकडून किंवा पायाच्याकडून अविचार होण्याचा संभव आहे. म्हणून म्हणतों निशाणाच्या बाबतींत आपला अपमान जरी झाला आहे तरी ही वेळ त्याचा विचार करण्याची नाहीं.

**गरु०:**—काय, मी झिंगलों आहें असें समजतां काय बुद्धिसिंगजी ? माझे हातपाय हालूं लागले आहेत, पण ते दारूमुळें नव्हेत. माझ्या अंगावर दारू कशी चढणार ? मी बिलकूल झिंगलों नाहीं. माझें निशाण उदेपूरच्या

निशाणाच्या शेजारीं रोंवण्याकरितां मी अगदीं उतावीळ झालों आहें. आणि म्हणूनच माझे हातपाय तुम्हांला असे कांपल्यासारखे दिसतात. चला, तुमच्या देखत मी आपलें—गरुडाचें-निशाण प्रतापसिंहाच्या शेजारीं रोवतों.

बुद्धि०:—गरुडध्वज, आपण झिंगला आहां असें मी कसें म्हणूं ? मदिरा आपल्या अंगावर कशी चढेल ? या जगांत मदिरेला जर कोणाचें भय वाटत असेल तर तें आपलें. तिला फस्त पाडणारे आपणच काय ते एकटे वीर. तिचा अंमल आपणांवर कसा बसेल ? असें पहा, कोणचाहि चांगला विचार असो, त्या विचाराची कांहीं काल उशी करून त्या उशीवर स्वस्थपणें डोकें ठेवून एक चांगलीशी झोंप काढल्याशिवाय त्या विचाराचें पूर्ण स्वरूप ध्यानांत येत नाहीं. म्हणून म्हणतों आपल्या या अपमानासंबंधानें—

गरु०:—माझ्या होत असलेल्या अपमानाचें सबंध चित्र आतांच माझ्यापुढें उभें आहे. आणखी झोंपेंत—स्वप्नांत—मला निराळें चित्र तें कोणतें दिसणार आहे ? बस्स, मला तुमचें म्हणणें पसंत नाहीं. मी असा जाऊन माझें निशाण प्रतापसिंहाच्या निशाणाशेजारीं रोंवणार.

बुद्धि०:—मला वाटतें तुमच्या अपमानाचें सबंध चित्र अजून तुम्ही पाहिलें नाहीं. गरुडध्वज, तुमचें सैन्य उदेपूरच्या सैन्याहून मोठें, तुमचा दर्जा उदेपूरच्या राण्याहून अधिक, असें असतांना उदेपूरच्या निशाणाशेजारींच तेवढें तुमचें निशाण फडकत राहिलें तर तेवढयानें तुमच्या अपमानाची भरपाई कसची होणार ? या दारूच्या धुंदींत तुमच्या हातून खरा पराक्रम कधींच होणार नाहीं. अहो, ही मदिरा बाई, ही का तुमच्या अंगांत शिरून तुमच्या हातून कांहीं पराक्रम करवणार आहे ? नवऱ्याशेजारीं बायकोनें हाताला हात लावून उभें राहावें, त्याप्रमाणें प्रतापसिंहाच्या निशाणाच्या काठीला तुमच्या निशाणाच्या फडक्यानें वाऱ्याच्या झोतानें डोलतां डोलतां हळूच स्पर्श करावा, एवढेंच काय तें बायकी महत्कार्य आतां तुम्ही करणार ना ? जा, गरुडध्वज जा,

मी तुम्हांला सांगतों दोनचार प्रहर स्वतःच्या तंबूंत जाऊन स्वस्थ झोंप घ्या. या झोंपेंत जीं स्वप्नें तुम्हांला पडतील तीं या दारूच्या आवेशापेक्षां अधिक चांगले विचार शिकवतील. आपल्यापेक्षां कमी दर्जाचे राजानें अधिक श्रेष्ठ जागीं स्वतःचें निशाण रोंवलें असतां तुमच्यासारखे मानी वीर त्या निशाणाचे तुकडे तुकडे कसे करतात, याचें चित्र तुम्हांला स्वप्नांत पाहावयाला मिळेल; प्रतिस्पर्ध्याचें निशाण अशा रीतीनें पायाखालीं तुडवून त्या ठिकाणीं स्वतःचें निशाण रोंवलें म्हणजे त्या शूराची वाहवा सर्व रजपूत सैन्यांत कशी होते, याचीं स्तुतिस्तोत्रें तीं स्वप्नें तुम्हांला ऐकवतील. गरुडध्वज, त्या चित्रांचें शांतपणें दर्शन घ्या, तीं स्तुतिस्तोत्रें सविस्तरपणें ऐका, आणि नंतर काय करायचें तें करा.

गरु०:—बुद्धिसिंगजी, तुम्ही मला काय नामर्द समजतां! मी भित्रा आहें असें मानतां काय? स्वप्नांतले दृष्टांत पाहून त्याप्रमाणें चाचपडत वागणारा हा गरुडध्वज खात्रीनें नाहीं. चला, तुम्ही माझ्याबरोबर चला. स्वप्न पडायच्या अगोदरच स्वप्नांतल्यासारखी कृति करून दाखवितों. मी इतका वेळ बोललों नाहीं, म्हणून मला नालायक समजतां काय? स्वप्नें पाहून वागणारे तुम्ही असाल; मी असें म्हणतों तुम्ही माझ्याबरोबर चला आणि माझी कृति पहा; म्हणजे तुमच्या स्वप्नांच्या अर्थाची दिशाभूल तरी व्हायची नाहीं. कर्ते पुरुष बोलून दाखवीत नसतात; म्हणून प्रतापसिंहाचें निशाण उपटून टाकून त्याच्या जागीं माझें निशाण रोंवणार आहें असें इतक्या वेळ मी बोलून दाखविलें नाहीं. स्वप्नांत दिसणारे अघोर प्रकार प्रत्यक्ष पाहण्याची ताकद जर तुमच्या डोळ्यांना असेल, तर मजबरोबर त्या टेंकडीकडे चला; आणि उदेपूरच्या फडक्याच्या चिंधड्या चिंधड्या या गरुडाचीं नखें कशीं करतात, तें स्वतः पहा. [ गरुडध्वज व त्याचे नोकर जातात

बुद्धि०:—हें काम ठीक झालें. प्रतापसिंहाच्या आजारामुळें पद्मावती

आपोआप माझा आश्रय घ्यायला कबूल होईल, या भरावर मी इतके दिवस होतों; म्हणून माझ्या बगलेंतल्या या मद्यपी कुत्र्याला उदेपूरचें निशाण दाखवून छू केलें नव्हतें. प्रेमध्वजानें आणलेल्या हकिमाचें औषध घेऊन प्रतापसिंह या पंधरवड्यांत चांगला बरा झाला, त्याबरोबर महाराणीचाहि माझ्याकडचा कल पुनः प्रेमध्वजाकडे झुकायला लागला आहे. महाराणी पडली भोळसट; तिला पाहिजे त्यानें थापा देऊन हवी तशी वळवावी. प्रतापसिंह बरा झाल्यामुळें अकबरशहाच्या त्या पद्मावतीच्या मागणीच्या मात्रेचाहि आतां त्याच्या मनावर फारसा परिणाम होणार नाहीं. त्या धाकाचे वळसे जर मी अधिक उगाळूं लागलों, तर पद्मावतीनें जशी माझी त्या दिवशीं शोभा केली, तशीच पूजा एखाद्या वेळेला प्रतापसिंहहि सर्वांच्या देखत बांधल्याशिवाय राहणार नाहीं. (पडद्यांत गलबला) हें आमचें कुत्रें आतां जोरजोरानें भोंकत चाललें! या गरुडानें जर उदेपूरच्या निशाणाची काठी मोडली तर रजपूत राजांच्या बेकीच्या काठीचा रद्दा प्रतापसिंहाच्या पाठीवर बसलाच म्हणून समजावें. अकबरशहाशीं आपलें संधान आहेच, आणि आतां प्रतापसिंहाची कंबर अशा रीतीनें मोडतों; पाहूं या पद्मावतीच्या गमजा मग किती दिवस चालतात त्या. आतां असें केलें पाहिजे, हें झिंगलेलें कोंबडें टेंकडीवर पोहोंचतें तोंच या अपमानाची वर्दी प्रतापसिंहाला देऊन याच्याशीं झुंझायला मानाति- शयानें तारवटलेलें तें दुसरें कोंबडें टेंकडीच्या दुसऱ्या बाजूला नेऊन सोडावें. अशीं कोंबडीं झुंजविल्याशिवाय आपला कार्यभाग कसा साधणार? [जातो

---

## प्रवेश पवथा.

स्थळ—प्रतापसिंहाच्या तंबूपुढील जागा.

बुद्धि०:—(प्रवेश करून) राणाजी, अहो राणाजी, प्रतापसिंहजी,

अहो प्रतापसिंहजी, काय, इथें कोणीं नाहीं ? राणाजींना झोंप लागली आहे का ? झोंप घेण्याची ही वेळ नव्हे. राणाजी, राणाजी, कोणी पहाऱ्यावर नाहीं का ? [ पहारेकरी येतो.

पहा०:—महाराणाजींचा थोडा डोळा लागला आहे. आज्ञा होत असेल तर जागे करतों.

बुद्धि०:—आतां त्यांची प्रकृति चांगली बरी झाली ना ? आज थकवा बिकवा कांहीं वाटत नाहीं ना ?

पहा०:—आतां पूर्वीसारखे बरे झाले आहेत, पण अद्यापि—

बुद्धि०:—तर मग आतां पणबीण कांहीं नको. जा, जा, राणाजींना लवकर जागे कर. झोंप घेण्याची ही वेळ नव्हे. राणाजींना जागे करण्याला जर उशीर लावलास तर असल्या कसुराबद्दल राणाजी तुला ठार मारण्याची शिक्षा दिल्यावांचून रहाणार नाहींत.—अहो राणाजी, राणाजी, झोंप घेत बसण्याची ही वेळ नव्हे.

प्रता०:—( बाहेर येऊन ) बुद्धिसिंगजी, कसली घाई हो ? कसली घाई आहे ? मला कांहीं तशी झोंप लागली नव्हती. तुम्ही असे घाबरल्यासारखे कां ? काय, तुमच्या हातून धड बोलवत नाहीं ! असें झालें आहे तरी काय तें बोला. बोला, कोणता प्रसंग आहे, बोला.

बुद्धि०:—प्रसंग भयंकर तर खराच, पण मला प्रथम असें सांगा, आपली प्रकृति चांगली बरी झाली ना ? तसें नसेल तर आपण झोंप घेत पडून राहणें हेंच अधिक चांगलें. आपल्या अंगांत जर पूर्वीचें बळ आलें नसेल तर आग्रहानें सांगतों, आपण अशीच कांहीं वेळ विश्रांति घ्या. प्रसंग वाईट तर खराच, पण आम्ही तो पाहून घेऊं.

प्रता०:—कोणता प्रसंग आहे तो मला सांगा. पूर्वींच्या दसपट शक्ति आतां माझ्या अंगांत आली आहे. मुसलमानी सैन्य एकाएकीं आमच्या

छावणीवर चालून आलें आहे काय ? अकबरशहानें इतर सर्व रजपूत राजांच्या छावण्या उध्वस्त पाडून माझ्या छावणीला गराडा दिला आहे काय ? बोला, तुमचा चेहरा असा भयंकर कां ? याहून कोणचें मोठें संकट आमच्यावर आलें आहे सांगा. आमच्या छावणीवर अवचित हल्ला करून आमच्या बायकांना—पद्मावतीला—मुसलमानांनीं पकडून नेलें आहे काय ? याहून भयंकर कोणचा प्रसंग आमच्यावर आला आहे ?

बुद्धि०:—हे सर्व प्रसंग आपल्यावर एकदम आले असते तरी मला आतांच्याइतकें वाईट वाटलें नसतें.

प्रता०:—सांगा. मला असें बुचकळ्यांत ठेवूं नका. काय झालें आहे तें एकदम सांगा. आजाराच्या आंथरूणावरून एकाएकीं उठून आलेला हा प्रतापसिंह तुमच्या तोंडचे ते शब्द ऐकल्यानंतर संकटाशीं टक्कर देण्याकरितां असाच्या असा जर पुढें धांवून गेला नाहीं, शस्त्रास्त्रें घेण्याकरतां जर मी मागें परतलों, किंवा इष्टमित्रांच्या मदतीची वाट पाहात तसाच वाटेंत थबकून जर उभा राहिलों; तर उदेपूरच्या तक्तावर एक नादान बाहुलें बसलें आहे अशी माझ्या नांवाची छीःथू साऱ्या जगभर करा. बोला, कोणचें संकट आलें आहे तें बोला.

बुद्धि०:—तें संकट सांगण्याकरतांच मी आलों आहे. असल्या संकटांतून सर्व सरदारांना—सर्व रजपुतांना—निभावून नेण्याची धमक एकट्या प्रतापसिंहाच्या मनगटांत आहे; हें मला पक्कें माहीत आहे; आणि म्हणूनच आपण आजारांतून नुकते उठतां आहांत तरी आपल्याकडे मीं प्रथम धांव घेतली. इथें आल्यावर आपली प्रकृति साफ बरी आहे असें ऐकलें तेव्हां मनाला धीरहि आला. पण राणाजी, विशेष मैत्री असली—तसेंच प्रेम वाटत असलें—म्हणजे नाहीं नाहीं तें पाप मनांत येतें; म्हणून विचारतों, आपली प्रकृति खरोखरच बरी झाली आहे ना ! तसें नसेल तर आपण या वेळीं त्रास करून

घेऊं नका. खुशाल जाऊन आपल्या तंबूंत आपण विश्रांति घ्या, या भानगडींत पडल्यानें संतापानें आपलें डोकें कदाचित् फिरून जाण्याचा संभव आहे. म्हणून म्हणतों भलत्या वेळीं आपणाला जागे करण्याच्या या अपराधाबद्दल आपल्या या मित्राला एकट्यालाच या सांप्रतच्या संकटाशीं झगडूं द्या.

प्रता०:—नाहीं, बुद्धिसिंगजी नाहीं. मी खरोखर बरा झालों आहें, आणि आतां मला समजलेंच पाहिजे आमच्यावर कोणचें संकट आलें आहे तें. संकटाशीं टक्कर देण्याकरतां मी जर तुम्हां सर्वांच्यापुढें गेलों नाहीं तर बुद्धिसिंगजीच्या मनसबीच्या तलवारीनें या धर्मयुद्धाच्या प्रारंभीं मला सेनापतीचा मान उगीच दिला असें नाहीं का होणार ?

बुद्धि०:—असें तर ठरतां कामा नये. मग त्यांत आपलें शौर्य तें काय उरलें, आणि माझी अक्कल ती काय उरली ?—ऐका, राणाजी, ऐका; मन घट्ट करून ऐका; राणाजी, रजपूत छावणींत बेकी झाली आहे. आपण सारे मिळून मुसलमानांशीं लढण्याकरतां येथें आलों, पण तें विसरून आपआपसांत लढून एकमेकांच्या माना कापण्यास सध्यां आम्ही तयार झालों आहों, हें आपणांला कळविण्याकरितां मी आलों आहें. धर्मयुद्ध चालू असेपर्यंत कोणाहि रजपुताविरुद्ध म्यानांतून तलवार बाहेर काढायची नाहीं अशी आपण प्रतिज्ञा केली असल्यामुळें हें बेकीचें युद्ध म्हणजे महाराणाजींवर अकस्मात् आकाशांतून पडलेला वज्राचा आघातच होय. राणाजी, कंबर खचूं देऊं नका. गरुडध्वज व त्याचे सरदार आपल्याला मिळालेला सेनापतीचा अधिकार या क्षणापासून झुगारून देऊन, टेंकडीवरील आपलें सेनापतीचें निशाण—उदेपूरच्या सिंहाचें तें निशाण—उपटून टाकून, पायाखालीं तुडवून, त्या ठिकाणीं स्वतःचें निशाण रोंवण्यासाठीं उन्मत्तपणानें निघालेले आहेत !

प्रता०:—माझ्या निशाणाचा असा उपमर्द करणारा गरुडध्वज कोण ? धर्मयुद्ध संपेपर्यंत कोणाहि रजपुताविरुद्ध हातांत शस्त्र धरणार नाहीं अशी

मीं प्रतिज्ञा केली असली, तरी गरुडध्वजाचें मनगट या हातांनीं धरून त्याच्या हातांतील तलवार जागच्या जागीं गळून पाडण्याची शक्ति या आजारानंतरहि प्रतापसिंहाच्या अंगांत अद्याप आहे.—कोण आहे पलीकडे! उदेपूरचीं रणवाद्यें वाजवा आणि सर्वांना ताकीद द्या, उदेपूरच्या निशाणाची बेअब्रू करणाऱ्या त्या गरुडध्वजाचा हात मी असा जाऊन पकडण्यापूर्वी माझ्या सरदारांनीं व मानकऱ्यांनीं तेथें एकदम दाखल झालें पाहिजे.

[ निघून जातो.

बुद्धि०:—हें काय प्रतापसिंहजी! इतकी घाई कशाला? आम्हीं हें काम पार पाडलें असतें. ( पहारेकऱ्यास ) अरे जा, जा, उदेपूरचीं रणवाद्यें वाजवा, जा. ( पहारेकरी जातो ) जा, तुम्ही सारे धांवत पळत लगबगीनें जा. आपण खुशाल आस्ते आस्ते रेंगाळत टेंकडीकडे जाणार. माझें घाईचें काम तेथें कांहींच नाहीं. दोन कोंबडीं झुंझवून एकमेकांनीं एकमेकांच्या हृदयांतील रक्त काढलें म्हणजे मग स्वतःच्या डोळ्यांत आसवें आणून, याच्या हृदयांतील रक्त अधिक निघालें कीं त्याच्या हृदयांतील रक्त अधिक निघालें हें तोलून दाखवून, जरूर त्या पक्षाला पुनः चिथावण्याकरतां आमची स्वारी संथपणानें टेंकडीकडे जाणार. [ जातो.

---

## प्रवेश पांचवा.

( स्थळ—प्रतापसिंहाच्या निशाणाची टेंकडी. गरुडध्वज व त्याचे सरदार येतात. )

गरु०:—बुद्धिसिंग कोठें आहेत? काय, ते मागेंच रेंगाळत राहिले? सरदारहो, त्यांना असे पुढें आणा. माझा पराक्रम त्यांना आपल्या डोळ्यांनीं पाहूं द्या.

**सर०:**—बुद्धिसिंगजी फार मागें राहिले आहेत.

**गरु०:**—नाहींत तर नाहींत ते. तुम्ही सगळे मला बुद्धिसिंगजीसारखेच आहां. एका बुद्धिसिंगाच्या ऐवजीं दोन बुद्धिसिंग, तीन बुद्धिसिंग, चार बुद्धिसिंग, शेंकडों बुद्धिसिंग! अहो शेंकडों बुद्धिसिंगहो, तुमच्या दोन शेंकडों नेत्रांनीं या गरुडध्वजाचा आतां पराक्रम पहा; आणि तुमच्या एक शेंकडों जिव्हा माझीं स्तुतिस्तोत्रें गायला तयार होऊं द्यात. हा गरुडध्वज हें उदेपूरचें निशाण या उजव्या हातानें असें खालीं ओढणार—

( प्रतापसिंह निशाणाच्या मागून येतो. )

**प्रता०:**—गरुडध्वजा, कोणाचा अपमान करतो आहेत याचा नीट विचार करून काय करायचें तें कर. या धर्मयुद्धांत आम्ही सर्व राजे बरोबरीचे आहोंत, एक मोठा व एक लहान असा भेद आम्ही मानीतच नाहीं. पण या धर्मयुद्धांतील रजपूतसेनेचा मुख्य सेनापति या एवढ्याच नात्यानें उदेपूरचें एकटें निशाण या टेंकडीवर फडकत आहे. इतर रजपूत राजांचीं निशाणें या ठिकाणीं नाहींत याचें कारण मी त्यांना हलके समजतों असें नव्हे. तर तुम्हींच सर्व राजांनीं मिळून या धर्मयुद्धांत सेनापतीचा मान उदेपूराला दिला असल्याकारणानें माझें एकट्याचेंच निशाण टेंकडीवर फडकत असणें योग्य आहे.—मी रणमैदानावर उभा राहण्यास असमर्थ आहे या समजुतीनें जर तूं माझ्या निशाणाचा असा अपमान करीत असलास, तर आजारानंतरहि वज्राचा कठोरपणा व शक्ति प्रतापसिंहाच्या मनगटांत कायम टिकली आहे याचा अनुभव घे, आणि आपल्या मनाची भ्रांति दूर कर. ( त्याचा उजवा हात डाव्या हातानें धरतो. ) मद्याच्या निशेंत किंवा भलत्याच भ्रांतींत हें कृत्य तूं करणार नसून जर उदेपूरचा अपमान करण्याच्या हेतूनें—

**गरु०:**—होय; उदेपूरच्या बरोबरीचा किंवा कांकणभर चढच मी आहें, हें सर्व सैनिकांना दाखविण्याकरतां मी हें माझें निशाण त्या ठिकाणीं रोंवणार.

प्रता०:—गरुडध्वज, नीट विचार कर व असलें साहस करण्यास प्रवृत्त होऊं नको.

गरु०:—यांत कसलें साहस! तुम्हीं माझा हात धरुन माझी जरी अशी अवस्था केली असली—अयाई! तरी माझे हे सरदार तुमचें निशाण उपटून काढून त्या ठिकाणीं माझें निशाण रोंवल्याशिवाय राहणार नाहींत;—अयाई! सरदारहो, या प्रतापसिंहानें माझा हात धरून—अयाई — माझा असा अपमान चालवला आहे.—घ्या, हें माझ्या हातांतील निशाण घ्या.—पाहतां काय! हा एकटा काय करणार! कोणी तरी अगोदर तें टेंकडीवरचें निशाण ओढून काढा आणि त्याच्या जागीं माझें हें निशाण रोंवा.

प्रता०:—(त्याच्या हातांतील निशाण घेत) डाव्या हातानें तुला असा जागच्या जागीं डांबून ठेवलाच आहे, आणि सरदारहो, हा माझा उजवा हात तुम्हां सर्वांच्या देखत गरुडध्वजापासून हें निशाण असें हिसकावून घेऊन पायाखालीं तुडवीत आहे. (घेऊन पायाखालीं तुडवतो.)

गरु०:—याच्या रक्तानें आमचें हें निशाण माखलें गेल्याशिवाय गरुडध्वजाच्या अपमानाची भरपाई होणार नाहीं. अयाई!—सरदारहो, तलवारी चालवा.

(तलवार उपसून सरदार प्रतापसिंहाच्या अंगावर जातात. प्रेमध्वज व त्याचे लोक धांवत येऊन मध्यें आडवे येतात)

प्रेम०:—अगोदर माझें रक्त तुम्हांला या भूमीवर शिंपडावें लागेल आणि नंतरच महाराण्याच्या रक्ताचें टिपूस तुमच्या दृष्टीस पडेल.

(प्रेमध्वज व गरुडध्वजाचे सरदार यांचे हात होतात.)

प्रता०:—काय करूं, या धर्मयुद्धांत असेपर्यंत रजपुतांपैकीं कोणावरहि तलवार उपसणार नाहीं अशी शपथ घेतल्यामुळें या वेळीं हात असूनहि थोटयाप्रमाणें वागावें लागत आहे! प्रेमध्वज, बस्स करा. तुमच्या

तलवारीचा तीक्ष्णपणा गरुडध्वजाच्या सरदारांच्या चांगला प्रत्ययाला आला.— जा, भित्र्यांनो जा. या वेळीं प्रतापसिंहानें आपली तलवार चालविली असती तर तुमच्या या निशाणाच्या काठीची जी गत आतां झाली तीच तुमच्या हाडांची झाली असती.—जा, जा, जा, माझ्या क्रुद्ध दृष्टीपुढें एक क्षणभरहि उभे राहूं नका. जा. ( गरुडध्वज व त्याचे लोक जातात. ) प्रेमध्वज, तुम्हीं आज तलवार चांगली गाजविली. रणमैदानावर मोंगलांशीं लढतांना तुमच्या तलवारीची करामत आम्ही पुष्कळ वेळां पाहिली आहे; पण त्या वेळीं आम्हांला वाटे कीं मोंगलांवर तुटून पडण्यास मोठेंसें शौर्य लागतें असें नाहीं. पण या निशाणाची अब्रू राखण्याकरतां तुम्ही आज रजपूत वीरांच्यावरहि एकदम उडी घेतलीत, त्यामुळें आमच्याबद्दलची आपली भक्ति व आपलें शौर्य यांची चांगली पारख झाली. प्रेमध्वज, शूर पुरुषांशीं दिल मोकळा करून बोललें पाहिजे; म्हणून मी तुम्हांला स्पष्ट सांगतों कीं साधु अमरनाथ यांच्या भवानीच्या मंदिरांत तुमची व पद्माव-तीची गांठ पडून तुम्हीं आपली पायरी सोडून कांहीं वर्तन केलें असें मीं जेव्हां ऐकलें त्या वेळीं मला तुमचा बराच राग आला, पण—

प्रेम०:—महाराज, माझ्या हातून त्या वेळीं जर कांहीं कसूर झाली असेल तर त्याची माफी, एखादी भयंकर शौर्याची कामगिरी सांगून, महा-राणाजींनीं करावी. शहाच्या छावणींतील हकीम येथें आणण्याच्या कामीं माझी अल्पसेवा कशी झाली हे महाराजांना विदितच आहे. औषध हातीं येत चाललें हें पाहून भवानीच्या मंदिरांत मला साहजिकपणें आनंद झाला व त्याच्या भरांत असतांना राजभगिनीचें दर्शन मला घडलें. ती आनंदाची बातमी त्यांना सांगतांना दोघांच्या स्थितींतलें अंतर जर मी विसरून गेलों असेन तर तो अपराध माझा नसून महाराणाजी बरे होणार असें वाटून झालेल्या आनंदातिरेकाचा आहे.

प्रता०:—तुमच्या तरवारीइतकीच करामत तुमच्या वाणींतहि दिसते! नवल नाहीं कीं भवानीच्या देवळांत तुम्ही बोलत असतांना तुम्हांला एकदम झिडकारून स्वतः शुद्धीवर राहण्याचें भान पद्मावतीला राहिलें नाहीं. —तें कसेंहि असो मी तुमच्याशीं खुल्या दिलानेंच बोलतों आहें, मला कांहीं तुमचें त्या वेळचें वर्तन पसंत पडलें नाहीं. पण औषध आणण्याच्या कामीं तुमचा उपयोग झाल्यामुळें मीं तुमच्याशीं या बाबतींत कडू न बोलण्याचा निश्चय केला. आणि आतां तर उदेपूरच्या निशाणाबद्दल दाखविलेल्या तुमच्या अभिमानामुळें, आतांच्या तुमच्या पराक्रमामुळें, आणि माझ्याविषयींच्या तुमच्या निष्ठेमुळें भवानीच्या देवळांतील प्रकाराबद्दल–कडू किंवा–गोड–कोणताच शब्द मी बोलत नाहीं. पण भलत्याच महत्त्वाकांक्षेला मी उत्तेजन देत आहें, असें मात्र समजूं नका. तुम्ही आपल्या सद्गुणानें व पराक्रमानें जर मोठ्या पदवीस चढणार असलां तर तुमच्या मार्गाच्या आड मात्र मी कधींहि येणार नाहीं; एवढेंच काय तें —

प्रेम०:—हाताखालच्या सरदारांना याहून मोठें बक्षीस उदेपूरच्या महाराणाजींना देतांच येणार नाहीं, असें मला वाटतें.

प्रता०:—माझें पुरतें ऐका. बक्षिसामध्यें व तुमच्यामध्यें अद्याप पुष्कळ अंतर आहे; व हें अंतर कमी कमी करून घेण्याचा मार्ग मीच तुम्हांला खुला करून देतो. प्रेमध्वज, मी तुम्हांला एक महत्वाची कामगिरी सांगणार आहें. आणि या कामगिरींत जर तुम्ही मोठें यश संपादन केलेंत तर माझा राग शांत करण्यास नव्हे तर लोभ संपादन करण्यासहि तुम्ही पात्र व्हाल. प्रेमध्वज, गरुडध्वजाची व त्याच्या सरदारांची आपण फटफजिती केली; तरी पण सर्व राजसभेपुढें हें आतांचें भांडण जाऊन असल्या उन्मत्त प्रकाराचा पूर्ण बंदोबस्त होईपर्यंत उदेपूरच्या या निशाणाचा पुनः अपमान होण्याचा संभव आहे. कोणा रजपुतालाहि इकडे फिरकूं देऊं नये असा बंदोबस्त केला, जर रजपूत

छावणींत कायमची दुही झाली असा बोभाटा मोंगलांच्या छावणींत होईल—

**प्रेम०:**—आणि तसें होणें सांप्रत बिलकूल चांगलें नाहीं. धर्मयुद्ध करायला आलेले रजपूत आपआपसांतीलच अधर्माच्या युद्धांत गुंग झालेले पाहून मोंगलांना आनंद होईल.

**प्रता०:**—म्हणून म्हणतों या निशाणाभोंवतीं सैन्याचा विशेष बंदोबस्त बिलकूल करतां कामा नये. तथापि या निशाणाची अब्रू जर यत्किंचित् मलीन झाली तर या धर्मयुद्धांत रजपुतांचा मोड झाला इतकेंच मला वाईट वाटेल.

**प्रेम०:**—या माझ्या तलवारीची आठवण इतक्यांत विसरून या निशाणाचा उपमर्द करायला कोणी धजेल असें मला वाटत नाहीं.

**प्रता०:**—तेव्हां या प्रकरणाचा राजसभेंत निकाल लागेतोंपर्यंत तुमच्या हातांतल्या त्या तलवारीला या निशाणाभोंवतीं पहारा करायला मी सांगत आहें. प्रेमध्वज, या निशाणाची बेअब्रू होणें आणि तुम्ही जिवंत राहणें या दोन्ही गोष्टी एकदम होतांच कामा नयेत.

**प्रेम०:**—या निशाणाला हात लावणारानें प्रेमध्वजाच्या देहांतला जीव प्रथम हिरावून घेतला असें पक्कें समजा.

**प्रता०:**—आणि प्रेमध्वज जिवंत राहून जर निशाणाला कोणी हात लावला तर हेंहि पक्कें लक्षांत ठेवा कीं, प्रेमध्वजाचा जीव मागाहून घ्यायला प्रतापसिंह कधींहि चुकणार नाहीं.—आतांपासून तुम्ही येथें पहाऱ्यावर उभे राहा. राजसभा बोलावून गरुडध्वजाला कोणचें शासन करायचें हें ठरवून घेण्याच्या उद्योगाला मी आतां लागतों. [ प्रतापसिंह व त्याचे लोक जातात.

**प्रेम०:**—पद्मावतीचें पाणिग्रहण महाराणा प्रतापसिंहाच्या संमतीनें मला कसें करतां येईल, याचा मार्ग या वेळीं मला दाखविणाऱ्या बा निशाणा, तुझी सेवाचाकरी करण्याचा हा प्रसंग मी परम भाग्याचा समजतों. मी तुझ्यापुढें पहारा करीत नसून तुझी पूजा अर्चा करण्यांतच गुंतलों आहें, असें समज.

शत्रूच्या रक्तानें तुला स्नान घातलें आहे, आणि तुला विटाळ करण्यास जर कोणी पुढें सरसावला तर त्याच्या रक्ताचा सडा मी या जमिनीवर घालण्यास चुकणार नाहीं. माझ्या तलवारीवर चमकणारें हें तेज म्हणजे तुझ्यापुढें लावलेले रत्नखचित निरांजनांतील दीपच होत. बा निशाणा, तुला फुलें कोणचीं वाहूं ? लढाईंत मिळविलेलें यश हेंच तुझ्या चरणीं वाहिलेलें पुष्प होय. पण प्रसाद म्हणून तूं तें फूल मला परत कसें देणार ? दोन हातांनीं कमलावराला कांहीं अर्पण केलें तर सहस्र हस्तांनीं उलट तो प्रसाद देत असतो. मीं रणांगणावर मिळविलेलें यश, बा निशाणा, सहस्र वेळां मला परत देणार असशील, पण मी प्रांजलपणें तुझ्यापाशीं कबूल करतों, कीं मला हा असला प्रसाद आतां पुरेसा झाला आहे. गरुडध्वज किंवा त्याचे अनुयायी हे पुनः येथें आले असतां आतांच्याप्रमाणें जर मीं तुझी पूजा अर्चा केली तर यशाशिवाय पराक्रमाबद्दल कोणचा मोबदला—कोणचा प्रसाद—मला देणार ?

[ पद्मावती हार घेऊन प्रवेश करते.

**पद्मा०:**—पराक्रमाबद्दल हा प्रसाद.

**प्रेम०:**—हा घ्यायला मी तयार आहें. निशाणा, माझ्या पराक्रमाबद्दल हेंच जर बक्षीस मला मिळायचें असेल तर एक गरुडध्वज राहो, पण हजारों गरुडध्वज जरी या ठिकाणीं युद्ध करण्यास सज्ज झाले तरी मीं एकटा त्या सर्वांना पुरेसा होईन; आणि माझ्या पराक्रमाच्या यशानें तुझी पूजा बांधीन.

**पद्मा०:**—मग हा प्रसाद द्यायला म तयार आहें. [ हार पुढें करिते.

**प्रेम०:**—मी त्या प्रसादासंबंधानें बोललों नाहीं. तो प्रसाद मला देवीच्या देवळांतच मिळालेला आहे. लांबून बोलणें, लांबून पहाणें, लांबून हार टाकणें, हा असलाच प्रसाद जर मला नेहमीं मिळायचा असेल, तर आकाशांत चांदणीनें चमकावें आणि भूतलावरूनच आम्हीं तिला वंदन करावें, अशी स्थिति नेहमीं पद्मावती, तुझ्यामध्यें व माझ्यामध्यें राहील.

**पद्मा०:**—कांहीं काळपर्यंत हीच स्थिति योग्य असते.

**प्रेम०:**—पण माझ्या मतानें तो काळ संपून गेला. या निशाणापाशीं मी तुझ्या प्राप्तीचा वर मागत होतों आणि तुझें नांव माझ्या जिभेवर येणार होतें. इतक्यांत उदेपूरच्या सकल रणदेवतांनीं या निशाणाखालीं तुला आणून उभी केली! आणि त्यामुळें तुझ्यावरचें प्रेम उघडपणें बोलून दाखविण्याचा हक्क मला प्राप्त झाला.

**पद्मा०:**—पण ह्या हक्काच्या आड मी कुठें येतें आहें? आपण जसें प्रेम बोलून दाखवितां आहां त्याप्रमाणें, माझी हरकत नसती तर, माझ्या जिभेनेंहि माझें प्रेम यावेळीं बोलून दाखविलें असतें!—पण आतां हरकत तरी घेऊन काय चालणार? जिनें आपला मघांचा पराक्रम तेथून पाहिला, जिनें महाराणा प्रतापसिंह यानें आपल्या पराक्रमाचीं केलेलीं वर्णनें ऐकलीं, उदेपूरच्या अब्रूचें रक्षण करणाऱ्या वीराचें दर्शन मनमुराद दृष्टीला घेतां यावें म्हणून सर्व निघून जाईपर्यंत जिनें इतका वेळ वाट पाहिली, ती पद्मावती, डोळ्यांनीं, कानांनीं व मनानें पराधीन झाली असतां, जिभेनें तेवढी स्वाधीन कशी राहील? अशा रीतीनें मी परतंत्र झाल्यावर आपणच सावध नाहीं, याबद्दल मी आपल्याला तरी दोष कसा देऊं? तरी पण आतांची ही वेळ व ही जागा अशीच आहे कीं, प्रेम लांबूनच असें दाखविल्याशिवाय दुसरें गत्यंतर नाही.

**प्रेम०:**—मग तो हार तुमच्याच हातांत असूं द्या. ज्या प्रसंगीं व ज्या ठिकाणीं आपणां दोघांना प्रेम एकमेकांच्याजवळ कुजबुजतां येईल, किंबहुना शब्दांनीं प्रेम व्यक्त करण्याची जरूर न राहून प्रेमाच्या अनुभवांतच मग्न राहतां येईल, अशाच वेळीं, अशाच ठिकाणीं, पद्मावतीच्या हाताच्या स्पर्शाबरोबरच त्या हाराचा स्पर्श मला घडूं दे.

**पद्मा०:**—या हाराचा आपण या वेळींच स्वीकार केला पाहिजे. हा हार प्रसाद म्हणून मी आपणांस देत नाहीं; तर या वेळीं जी विनंति मी करणार

आहे, त्या विनंतीची आठवण म्हणून देत आहे. [ हार देते.

**प्रेम०:**—( हार घेऊन ) कोणची आज्ञा आहे ? पद्मावतीशिवाय नुसत्या या हाराचेंच ग्रहण करण्याइतकी जरी ती कठीण आज्ञा असली, पद्मावतीला नुसती लांबून पाहून प्रेमाचा कोंडमारा मनांत करण्याइतकी जरी ती आज्ञा दुर्धर असली, तरी ती तुझी आज्ञा मला शिरसावंद्य आहे.

**पद्मा०:**—मला विनंति इतकीच करायची आहे कीं, बुद्धिसिंगजींनीं मला पूर्वी मागणी घातली होती; दादाच्या मनांत मला बुद्धिसिंगाला द्यावयाचेंहि होतें; पण मींच त्याला झिडकारून टाकलें. रजपुतांतील एक प्रख्यात राजा धिःकारण्याची शक्ति आपलें दर्शन झाल्यानंतर माझ्या अंगीं आली, यांत कांहीं नवल नाहीं. पण महाराज, या धर्मयुद्धांत प्रत्येक वेळीं व प्रत्येक ठिकाणीं संधि आली कीं तो माझी पिच्छा पुरवीत आहे. आणि मी त्याला वारंवार नाकारल्यामुळें माझ्यावर सूड उगविण्याच्या बुद्धीनें दिल्लीच्या शहाला मला देऊन टाकून तह करण्याची युक्तीहि त्यानेंच राजसभेंत काढली. बुद्धिसिंगाचें हें कपट जेव्हां मला समजलें तेव्हां आपल्यावरील माझें प्रेम शब्दांनीं जरी नाहीं तरी हारानें मला व्यक्त करणें भाग पडलें.

**प्रेम०:**—मग बुद्धिसिंगानें माझ्यावर हे मोठे उपकारच केले म्हणायचे !

**पद्मा०:**—आणि त्याचे हे उपकार फेडण्यास आपण कसूर करूं नका एवढीच माझी आपल्याला विनंति आहे.

**प्रेम०:**—सांग, ते उपकार कसे फेडूं सांग.

**पद्मा०:**—आपल्यावर निमूटपणें प्रेम करणारी मला एक सवत आहे. मी हारानें तरी प्रेम व्यक्त केलें, शब्दांनीं प्रेम बोलून दाखविलें, पण स्मित हास्याच्या आरक्ततेशिवाय इतर कशानेंहि तिनें आजपर्यंत प्रेम व्यक्त केलेलें नाहीं. असें असूनहि तीच माझ्याहून अधिक भाग्यवान् आहे ! कारण आपण तिला नेहमीं आपणाजवळच बाळगीत असतां.

**प्रेम०:**--पद्मावती, खरेंच सांगूं ? तुझ्या ह्या मुखचंद्राशिवाय कोणत्याहि स्त्रीचा चेहरा निरखून पाहण्याची मला इच्छा झाली नाहीं. मग अशा कोणच्या स्त्रीच्या गालावरची लाली पाहून मीं तिला तुझ्याहून अधिक मान दिला ?

**पद्मा०:**—दुसरी कोणची सवत ? या वेळीं आपल्या कमरेला मिठी मारून असलेल्या तलवारीशिवाय मला दुसरी कोणती सवत असणार ? शत्रूच्या रक्तांत तिनें केव्हां केव्हां लाल व्हावें आणि त्या वेळींच काय तें आरक्ततेनें आपलें प्रेम व्यक्त करावें. पण एवढ्यावरूनहि तिला आपण कायमची अर्धांगी करून ठेवली ! बुद्धिसिंगाचे उपकार जर आपणांला फेडावयाचे असतील तर त्या तरवारीला बुद्धिसिंगाशीं गाढ प्रेमालिंगन देऊं दे आणि नंतर—

**प्रेम०:**—पद्मावतीच्या प्रेमालिंगनाची इच्छा करा असें जर तुझें म्हणणें असेल, तर तूं सांगशील त्या वेळीं, सांगशील त्या ठिकाणीं, बुद्धिसिंगाशीं द्वंद्वयुद्ध करण्यास मी तयार आहें. आणि ही तलवार त्याच्या रक्तानें माखल्यानंतर मी तुझ्या हाताचा स्पर्श करण्याची परवानगी मागेन. सांग, कोणत्या वेळीं व कोणत्या ठिकाणीं त्याला गांठूं सांग.

**पद्मा०:**—महाराज, मला तो नेहमीं प्रेमाच्या गोष्टी बोलून छळीत असतो. आपल्यावर माझें मन बसलें आहे, हें त्याला कळून चुकलें आहे. आपल्याविषयीं केव्हां केव्हां तो भलतेच उद्गार काढतो आणि त्या वेळीं माझ्या पायाची आग मस्तकाला जाते. असा प्रसंग जर पुनः आला तर आपण माझ्या विनंतीला मान देऊन—

**प्रेम०:**—तो एक चकार शब्द तोंडावाटें बाहेर काढूं दे लगेच मला बोलाव, मग पाहतों गुलामाचा तमाशा.

**पद्मा०:**—या निशाणाची अब्रू योग्य रीतीनें राखल्यानंतर आपल्या प्रेमाचा विषय उदेपूरची राजकन्या करण्यास आपण लायक व्हाल असें दादांनीं नुकतेंच आश्वासन दिलें आहे. मीहि आपणांस वचन देतें कीं

राजा बुद्धिसिंग याला द्वंद्वयुद्धांत आपण योग्य प्रायश्चित्त दिल्यावर पद्मावती दुसऱ्या कोणाचीहि होणार नाहीं.

**प्रेम०:**—पद्मावती, या निशाणाला साक्षी ठेवून मी प्रतिज्ञा करतों कीं उदेपूरच्या या निशाणाच्या अब्रूप्रमाणें तुझ्या अब्रूचें रक्षण करण्यास माझी तलवार किमपिहि कसूर करणार नाहीं. द्वंद्वयुद्धाकरतां मला बोलावतांना आतांच्या तुझ्या माझ्या या वचनाची खूण म्हणून तुझ्या बोटांतील ती आंगठी मजकडे पाठीव; त्या आंगठीवरील हिऱ्याच्या तेजाचे किरण माझ्या डोळ्यांत शिरतात न शिरतात तोंच माझ्या या तलवारीचें टोंक बुद्धिसिंगाच्या हृदयांत शिरायला धांव घेतल्याशिवाय राहणार नाहीं. [ पडदा पडतो.

## अंक दुसरा समाप्त.

——

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला

(क्षय प्रवेश करतो.)

क्षयः—आजच्या सारखा हिरमोड माझा पूर्वी कधींच झाला नव्हता. मला वाटलें होतें, आमचे गरुडध्वज महाराज उदेपूरचें निशाण पायाखालीं तुडवतील आणि उदेपूरच्या सरदारांची कत्तल होऊन क्षयाचा ध्वज रजपुतांच्या छावणींत चोहोंकडे फडकत राहील; मग हा क्षय, गरुडध्वज व बुद्धिसिंग या दोन राजांच्या तंबूमध्यें वाहणाऱ्या मदिरेच्या नदींत, मधून मधून गटकळ्या खात, डुंबत राहील! पण सगळेंच पारडें फिरलें. गरुड-ध्वजांनीं आतां तर आम्हां सगळ्या नोकरांना ताकीद दिली कीं खुद्द महाराजांशिवाय इतर. कोणींहि दारूचा थेंबहि तोंडास लावतां कामा नये. ज्याच्या तोंडाला दारूचा वास येईल त्याला हाकून देण्यांत येईल. असा हुकूम झाल्यामुळें मीं बुद्धिसिंग महाराजांची ही देवडी आपण होऊन संभाळण्याला प्रारंभ केला. आजच्या मेजवानींत मी इतकी दारू प्यालों आहें कीं, मला वाटलें माझ्या तोंडाची घाण दोनचार जन्म तरी नाहींशी व्हाव-याची नाहीं. पण मी मघांपासून बघतों आहें, मला दारूची येथें घाण कां येत नाहीं! बुद्धिसिंग महाराजांच्या त्या तंबूंत ओतण्यांत आलेल्या अत्तरामुळें माझ्या तोंडांतील वाफेचा–मद्याचा–घमघमाट नाहींसा झाला काय! मघांशीं मी गरुडध्वजाच्या छावणींत होतों तेव्हां वस्सदिशीं वास येत होता, आणि एखादे वेळेला त्या दर्पानें माझें मला ओकायला येईल कीं काय अशी भीति वाटत होती! हा बुद्धिसिंग हुशार, मोठा बुद्धिमान्, फार

कल्पक ! या बेटयानें दारूच्या शिशांच्या तोंडांबरोबर अत्तरांच्या बुदल्यांचींहि तोंडें आपल्या तंबूंत मोकळीं करून ठेविलीं आहेत ! आणि त्यामुळें आतां मला वाटूं लागलें आहे कीं पूर्वी दहापांच पिढयांत तरी मी दारू प्यालों नसलों पाहिजे. येऊं दे, कोण पाहिजे त्याला येऊं दे, आणि माझ्या तोंडाचा वास घेऊं दे. कोणाची छाती लागली आहे, मी दारू प्यालों असें म्हणण्याची ?—अहो कोणी आसपास येथें नाहीं का हो ? पहारेकऱ्यांपैकीं कोणीच जागें नाहीं का ? अरे कोणी तरी जागे व्हा आणि माझ्या तोंडाचा वास घेऊन पहा. थोडयाशा दारूनें झिंगून कायमची झोंप लागली आहे वाटतें ! मी पखालभर दारू प्यालों आहें, पण जरा तरी तोंडाला वास यायचा होता ? देवा, माझ्या तोंडाची परीक्षा करायला कोणाला तरी या वेळीं पाठवून दे. अरे हो, कोणी तरी दिसत आहे. ( वृद्धि येते. ) अरे ही कोण बाई दिसते. माझ्या तोंडाजवळ आपलें नाक आणून ही कसली वास घेणार ? ( वृद्धीच्याजवळ जाऊन ) बाई, आपण घटकाभर बुवा होतां का ? माझें विशेष कांहीं काम नाहीं आहे; माझ्या तोंडाची परीक्षा—

**वृद्धि०**:—मेल्या अपशकुन्या, अशा या रात्रींहि मला अपशकुन करायला पुढें आलास ना ?

**क्षय०**:— अरे ही वृद्धि ! माझीच बायको !–बाई, माझ्या तोंडाचा वास घेऊन पाहतां का ?

**वृद्धि०**:—दूर हो अपशकुन्या. जिथें जाशील तिथें नाश करीतच सुटायचास, तुझ्या नव्या मालकाची–गरुडध्वजाची–तशी आज फजीती झाली; आतां मला अपशकुन करायला कशाला आपली धिंडका आली ?

**क्षय०**:—तुझें काम तडीस जावो असेंच मी इच्छितों; पण माझें अगोदर थोडें ऐक. मला तूं असें सांग तुला येथें कसला वास येतो ?

**वृद्धि०**:—नाहीं, कसला नाहीं.

**क्षय०:**—नीट त्या तंबूकडे नाक रोखून धर; आणि आतां सांग एखाद्या अत्तराची घाण तुला येते का ?

**वृद्धि०:**—अरे, हे राजे लोकांचे तंबू; अत्तराचा घमघमाट असा येथें चोहोंकडे सुटलेला असायचाच.

**क्षय०:**—मग आतां असें सांग, दुसरा कसला सुवास तुला येतो आहे का ?

**वृद्धि०:**—दुसरा रे कसला येणार ? अत्तरें पांचसात प्रकारचीं असतील इतकेंच; त्यांत काय आहे एवढें मोठेंसें !

**क्षय०:**—त्यांतच खरें वर्म आहे. वृद्धि, तूं आपणाला चाणाक्ष समजतेस, पण तुला अगदीं कांहींच बुद्धि नाहीं. मी आजच्या रात्रीपासून बुद्धिसिंगाच्या देवडीवर येऊन पडलों आहें, आणि त्यामुळें माझी बुद्धि कशी फोफावूं लागली आहे. आणि म्हणून तुला या प्रसंगीं थोडकासा बुद्धिवाद सांगतों. जिथें पांचसात अत्तरांचा भपका येत असेल, डोक्याला, हाताला, नाकाला, कानाला जिथें अत्तरें चोपडेलेलीं असतील, तिथें तूं हें पक्कें समज, अत्तराच्या सुवासाच्या गुलाबाच्या खालीं मद्यप्याच्या तोंडाच्या मोरींतील दारूच्या दुर्गंधाचे कांटे असे छपवून ठेविलेले असतात ! तेल्याच्या धोतराप्रमाणें अत्तरानें मलीन झालेल्या हातरुमालांत गुंडाळलेली दारूची शिशी असायचीच. हें पक्कें लक्षांत ठेवून अत्तराच्या दपाला भुलून यापुढें माझ्या तोंडाशिवाय दुसऱ्या कोणाच्याहि तोंडाच्या शेजारीं तूं आपल्या नाकाला जाऊं देऊं नकोस. ही मी तुला गुरुकिल्ली सांगतों; अत्तराची वृद्धि चेहऱ्यावर असली म्हणजे दारूचा क्षय तोंडांत आहेच म्हणून समज.

**वृद्धि०:**—मेल्या, किती रे दारू प्याला आहेस ? कसली ही तुझ्या तोंडाला घाण येत आहे !

**क्षय०:**—मला वाटलें होतें अत्तराच्या भपक्याखालीं ती मरून जाईल म्हणून. खरोखर घाण येते का ? पुन्हा एकदां पाहतेस का ?

वृद्धि०:—मेल्या, तोंड आतां पुढें कर अशी चपराक देतें—अत्तराचा फाजील शोक दाखविणारा मनुष्य हटकून दारूबाज असायचा. हें आतां माझ्या चांगलें लक्षांत आलें.

क्षय०:—तसें नव्हे ग. मला माझ्या तोंडाची परीक्षा केलीच पाहिजे. गरुडध्वज महाराजांनीं हुकूम सोडला आहे, ज्याच्या तोंडाला दारूची घाण येत असेल, त्याला छावणींत घेऊं नये म्हणून. तेव्हां खरें सांग, माझ्या तोंडाला खरोखरच का घाण येतें ?

वृद्धि०:—हो, खरोखर घाण येते. तुझ्या चेहऱ्यावर अत्तराची संततधार कित्येक वर्षें एकसारखी जरी धरली तरी देखील ती घाण नाहींशी व्हायची नाहीं.

क्षय०:—तर मग काय, मला पुन्हां आपला मालक बदलण्याची पाळी येणार म्हणायची ! या बुद्धिसिंगजींच्या देवडीवर आतां आम्हांला कायमचें पडून राहावें लागणार एकूण.

वृद्धि०:—येथें तरी तूं कायमचा कसचा टिकणार. अपशकुनी तूं, जिथें जाशील तिथून तुझी हाकलपट्टीच व्हायची !

क्षय०:—मी अपशकुनी काय ? आणि तुझा काय एवढा मोठा शकुन चांगला आहे ? तुझा शकुन जर चांगला असता तर अमरनाथ साधूनें तरी तुला कां अशी दूर लोटली असती ?

वृद्धि०: माझा पायगुण चांगला म्हणूनच मला प्रेमध्वजांना देण्यांत आलें. तुझ्या न् माझ्या स्थितीमधलेंच आतांचें अंतर पाहिनास ? तूं ह्या दारांतून त्या दारांत, त्या देवडीवरून या देवडीवर भटकत फिरत आहेस; स्वस्थ पडायला तुला टीचभर थाराहि नाहीं; कोणीहि आपल्या सावलीला तुला उभेंहि राहूं देत नाहीं. आतां मजकडे पहा, पद्मावती ताईसाहेबांच्या हातांतील ही अंगठी घेऊन महाराणी साहेबांनीं मला पाठविलें आहे,—

क्षय०:—वा: ! वा: ! चांगली सुशील महाराणी आहे ती. तुझ्या नवऱ्याची—क्षयाची—अशी दुर्दशा झालेली पाहून मजकडे ती अंगठी पाठवून दिली ! फार कनवाळू महाराणी दिसते ! पण काय ग ? पद्मावतीच्याच हातांतली ती अंगठी माझ्याकडे कां पाठवून दिली ?

वृद्धि०:—तुझ्याकडे ? मेल्याच्या जिभेला हाडच नाहीं ! तुझ्याकडे ?

क्षय०:—तसें नव्हे, प्रेमाची बाधा व्हायचे हे पद्मावतीचे दिवस; अशा वेळीं तिला या क्षयाची बाधा होऊन, आपल्या हातांतील ती हिऱ्याची अंगठी तिनें मजकडे कां पाटवावी ?

वृद्धि०:—असल्या अपशकुनी क्षयाची बाधा पद्मावती ताईसाहेबांना झाली आहे, असें म्हणतांना तुझी जीभ कां झडून पडली नाहीं ? बुद्धिसिंगाच्या दरवाजांत बसून हीच का तुला बुद्धि आठवली ? मूर्खा, तुला का ही अंगठी द्यायला दिली आहे ?

क्षय०:—माझ्या बायकोनें मला जर अंगठी द्यायची नाहीं तर कोणाला द्यायची ?

वृद्धि०:—अंगठी द्यायला मी निघालें नाहीं; अंगठी दाखवायला निघालें आहें.

क्षय०:—आणखी ती तूं दाखविलीसहि; आतां जा परत.

वृद्धि०:—मीं नाहीं तुला दाखवली. तूंच वाटेंत उभा राहून मला अपशकुन करून क्षयाची नजर या अंगठीवर पाडलीस. इडापिडा टळो आणि या हिऱ्याचें निर्मल तेज आकाशांतील या चंद्राप्रमाणें प्रेमध्वजांना सुखकर होवो.

क्षय:०—काय, प्रेमध्वजाला ही अंगठी दाखवायला निघाली आहेस ?

वृद्धि०:—होय, या अंगठीची खूण दाखविली म्हणजे ते तावडतोब पद्मावती ताईसाहेबाच्या तंबूंत येणार आहेत.—असें माझ्याकडे निरखून पाहूं

नकोस. त्या दोघांचें लग्न लवकरच ठरणार आहे. म्हणून म्हणतें, क्षया, माझ्या वाटेंतला हा तुझा अपशकुनी चेहरा दूर कर. अरे, जिथें जिथें ही वृद्धि जाईल तिथें तिथें अशींच लग्नें जुळून यायचीं. तूं मात्र माझ्यापासून दूर असला पाहिजेस. [ निघून जाते.

क्षय०:—मी कसचा दूर होणार! लग्नांच्या वृद्धीच्या पाठोपाठ एखाद्या सांथीच्या रोगाच्या रूपानें मी संचाराला बाहेर पडत असतों. अरे, पण मी अजून कसा हिच्या मागोमाग गेलों नाहीं? माझ्या तोंडाला वास येतो, असें ती म्हणाली नाहीं? होय, यायला लागला खरा. गरुडध्वज महाराजांच्या ताकिदीचे शब्द कसे अजून माझ्या कानांत घुमत आहेत! आपण येथेंच आज पडून रहाणार, अरे, पहारेकऱ्यांपैकीं कोणी जागे नाहीं का रे? जागे व्हा, कोणी तरी वृद्धीच्या मागोमाग चला. पद्मावतीची अंगठी दाखवून ती प्रेमध्वजाला बोलवायला निघाली आहे. माझ्याऐवजी कोणी तरी तिच्या मागोमाग पळा आणि प्रेमध्वजाच्या प्रेमावर बिब्बा घाला. या बुद्धिसिंगाच्या छावणींतील सर्व नोकर निर्बुद्ध बेटे! बुद्धिसिंग हें नांव मोठें पण लक्षण खोटें. अरे, मी क्षय जर वृद्धीच्या पाठोपाठ या वेळीं जात नाहीं तर तुमच्यापैकीं कोणाला तरी माझ्याऐवजीं वृद्धीचा पाठलाग करण्याची बुद्धि नाहीं का होत? नको होऊं द्या; मीहि झोंप घेतों, क्षयाचें काम मीं एकट्यानें तरी कां करावें? सगळेच घोरत पडूं. [ जातो.

( बुद्धिसिंग प्रवेश करतो. )

बुद्धि०: – तुम्हां सगळ्यांना झोंप येते पण मला कोठें येते? पद्मावतीच्या तंबूंत त्याला अशा चांदण्या रात्रीं बोलावलें आहे काय? मीं गरुडध्वजाला चिथावून दिलें तें प्रेमध्वजाच्याच पथ्यावर एकूण पडलें म्हणायचें! त्याची ती मर्दुमकी पाहण्यास पद्मावती त्या ठिकाणीं उभी होती म्हणे. या विचारामुळें काय करूं आणि काय नको असें मला झालें आहे—मीं रचलेलें गाणें

त्या दोघांच्या प्रेमाचे सूर एकमेकांशीं मिळवण्यास कारणीभूत व्हावें अं?—प्रेमध्वजा, ती आंगठीची खूण पाहून तूं जर पद्मावतीच्या तंबूंत गेलास तर तुम्हां दोघांचे प्रेमाचे गोड शब्द एकमेकांत मिसळतात न मिसळतात तोंच प्रेमाचा विध्वंस करणारा बेसूर व कर्कश आवाज तुझ्या कानीं पडल्यावांचून राहणार नाहीं.—क्षया, तूं या वेळीं खुशाल झोंपीं जा; वृद्धीच्या पाठोपाठ राहून शाब्दिक शापानें जें काम तूं करीत असतोस तेंच काम प्रत्यक्ष हातांनीं करण्यासाठीं मीं आतां जातों आहें. [ जातो

---

## प्रवेश दुसरा.

( निशाणासमोर प्रेमध्वज पहारा करीत आहे. )

**प्रेम०:**—गरुडध्वजाच्या लोकांना आज चांगली अद्दल घडली. या निशाणाला हात लावायला आतां रात्रीं कोण येणार आहे? तरी पण या निशाणाभोंवतीं रात्रभर मला खडा पहारा केला पाहिजे.—आजची रात्र मला मोठी त्रासाची जाणार असें वाटतें. लढाईच्या प्रखर विचारांच्या कल्होळानें मनांत एकदां एकच कोलाहल माजवून द्यावा तर लगेच कोमल प्रेमलहरीवर आरूढ होऊन मनानें डोलूं लागावें! परस्परविरुद्ध अशा या दोन विकारांच्या तंट्यांत ही सबंध रात्र मी कशी कंठूं?—माझ्या मनाप्रमाणें हें आकाशहि या वेळीं समदुःखी दिसत आहे! क्षणांत हें आकाश चंद्राच्या शीतल किरणांनीं सतेज आणि आल्हाददायक दिसतें, तर क्षणांत काळ्याकुट्ट ढगांनीं व्यापून गेल्यामुळें, देव आणि दैत्य यांचें हेंच तें भीषण समरांगण, अशी आठवण मनुष्याच्या डोळ्यांना होते. चालला पडत अंधःकार!—अशा काळोखाच्या वेळेला कोण मजकडे येत आहे? पावलें ऐकूं येतात! ( वृद्धि प्रवेश करते. ) कोण आहे? लांब उभा रहा. काळोखांत निशाणाजवळ

येण्याची संधि मिळेल या आशेनें जर तुम्ही येत असाल तर ती आशा फुकट आहे. माझ्या तलवारीचें तेज सूर्याच्या तेजाइतकें प्रखर असल्यामुळें अंधारांतहि माझा शत्रु अचूक माझ्या डोळ्यांना दिसतो, हें ध्यानांत धरा.

**वृद्धि०:**—मी शत्रुमित्रु कुणी नाहीं. पद्मावती ताईसाहेबांची मी दासी आहें. आपण मला ओळखलें नाहींत का ?

**प्रेम०:**—का ? ?–ओळखली तुला; आतां तुझा चेहराहि मला चांगला दिसूं लागला. त्या चंद्राजवळ तूं नेहमीं राहाणारी, आकाशांतील चंद्राच्या उजेडाची तुला काय जरूर !

**वृद्धि०:**—पद्मावती ताईसाहेबांवर आपलें तसेंच प्रेम आहे; तेव्हां आपणाला असें वाटणें साहजिकच आहे, पण महाराज, मी आपल्याला जी आतां दिसूं लागलें ती ते ढग दूर झाले म्हणून हो.

**प्रेम०:**—एका चंद्राच्या आठवणींत माझें मन गुंगून गेल्यामुळें हा चंद्र पुन्हां उगवल्याचें भानहि मला राहिलें नाहीं—वृद्धि, तूं या वेळीं येथें कां आलीस, सांग पाहूं.

**वृद्धि०:**—आपणाला बोलावण्याकरतां मी आलें आहें.

**प्रेम०:**—कोणी बोलावलें आहे ?

**वृद्धि०:**—दुसरें कोण बोलावणार ?

**प्रेम०:**—वृद्धि, तुला आणि तुझ्या मालकिणीला वेड तर लागलें नाहीं ना ? चंद्र दुसऱ्याला वेड लावीत असतो पण स्वतः वेडा होत नसतो. या निशाणावर सर्व रात्रभर पहारा करण्याचें काम महाराण्यांनीं मजवर सोंपवलें आहे हें पद्मावतीला माहीत नाहीं काय ?

**वृद्धि०:**—तें काय मला माहीत ? आपणाला बोलावलें आहे, म्हणून विनंति करण्याची मला आज्ञा झाली; आणि खूण म्हणून ही अंगठी दाखीव असें राणीसाहेब म्हणाल्या.

**प्रेम०**:—(स्वगत) ही अंगठी—पद्मावतीच्या बोटांतील ही अंगठी—खुणेची ही अंगठी! या हिऱ्याचे किरण ज्या वेगानें माझ्या डोळ्याकडे धांवत येतील त्याहून अधिक वेगानें मी, पद्मावती, तुझ्याकडे धांवत येईन, असें पद्मावतीला मीं वचन दिलें आहे.

**वृद्धि०**:—महाराज, मी काय सांगूं ताईसाहेबांना? आपण येतां आहां म्हणून सांगूं, कीं येत नाहीं म्हणून सांगूं?

**प्रेम०**:—थांब, एक क्षणभर थांब. मला नीट विचार करूं दे. अंगठीच्या किरणांनीं माझें अंतःकरण आतां सर्व व्यापून टाकल्यामुळें निशाणाच्या संरक्षणाच्या विचारांत हृदयास किंचित्‌हि थारा उरलेला नाहीं—चल, हा मी आलोंच.—तरी पण थांब. एक क्षणभर मला विचार करूं दे नकोच विचार. पद्मावतीच्या अब्रूचा नाश जर तो दुष्ट बुद्धिसिंग या वेळीं करीत असेल तर उदेपूरच्या त्या चालत्याबोलत्या अब्रूच्या प्रश्नापुढें या निर्जीव निशाणाची कथा ती काय?—निशाणा, मी प्रेमाचे सुखसोहाळे भोगण्यास जात नसून प्रेमाप्रीत्यर्थ लढण्यास जातों आहें, हें ध्यानांत धर; आणि थोडा वेळ तुझ्या सेवेंत होणाऱ्या या कसूरीबद्दल मला माफी कर.—वृद्धि चल; तूं म्हणतेस तिकडे लवकर चल.

[ प्रे० व वृ० जातात. बुद्धिसिंग येतो.

**बुद्धि०**:—माझें नशीब चांगलेंच आहे म्हणायचें. प्रेमध्वजा, जा, जा; तूं प्रेमाच्या निरोपासरशीं चाललास खरा, पण प्रेमाच्या पिंजऱ्यांत न पडतां तूं आतां सिंहाच्याच जबडयांत पडणार. प्रेमानें अंध होऊन तूं जाऊन परत येणार तो येथें भयंकर खड्यांत पडायलाच परत येणार, हें पक्कें समज. (निशाणाचे फाडून फाडून तुकडे करतो व काठी मोडून टाकतो) प्रेमध्वजा; या वेळीं तूं ध्वज सोडून प्रेमाकडे गेलास खरा पण आतां तूं प्रेमालाहि मुकलास आणि ध्वजालाहि मुकलास. [ हकीम प्रवेश करतो.

हकी०:—प्रेमध्वज, ! अहो प्रेमध्वज !

बुद्धि०:—( स्वगत ) या वेळीं कोण प्रेमध्वजाला हांका मारायला आलें? मला इथून लवकर पाय काढला पाहिजे. चंद्रा ! माझें हें कृत्य तुझ्या हातून पाहवलें नाहीं म्हणून तूं काळ्या मेघांच्या पडद्याआड आपलें तोंड लपवलेंस खरें, पण त्यामुळें पडलेल्या या अंधःकाराची मला मदतच झाली.

हकी०:—प्रेमध्वज ! अहो प्रेमध्वज !

बुद्धि०:—( स्वगत ) प्रेमध्वजाचे हे मित्र जवळ येत चालले. निशाणाचा नाश झाल्याबद्दल प्रेमध्वजाच्या अगोदर अश्रु ढाळून प्रेमध्वजावरील आपलें प्रेम हे आतां व्यक्त करणार. आतां आपण इथून पाय काढावा हें बरें. [ जातो.

हकी०:—अहो प्रेमध्वज ! अहो प्रेमध्वज !—काय निशाणावरचा पहारा सोडून तुम्ही दूर चाललां? अहो, मी हकीम; मला ओळखलें नाहींत?—छत् ! या काळोखांतून लपूनछपून जाणारा तो माझा मित्र प्रेमध्वज खात्रीनें नव्हे. प्रेमध्वजाला थकवा येऊन झोंप लागल्यामुळें तो येथेंच कोठें तरी जमिनीवर निजून राहिला आहे काय?—चंद्रा, बरें केलेंस; या वेळीं ढगांचा पडदा बाजूला सारून आपल्या प्रकाशाचें साहाय्य माझ्या नेत्रांना दिलेंस, हें बरें केलेंस; काय, मला हें निशाण असें अर्धें मोडलेलें दाखवण्याकरितां, चंद्रा, तुझे किरण या ठिकाणीं पाडलेस काय? यापेक्षां होता तो अंधःकार काय वाईट होता? मेघांनो, आपल्या काळ्याकुट्ट राशींत या जगाला पुन्हां गाडून कां टाकीत नाहीं?—नको, हा चंद्र असाच दैदीप्यमान आणखी थोडा वेळ प्रकाशूं दे. उदेपूरच्या मोडलेल्या निशाणावर जसा या वेळीं त्याचा प्रकाश पडला आहे त्याचप्रमाणें येथून छपतछपत जाणाऱ्या प्रेमध्वजाच्या त्या शत्रूवरहि आतां चांगला प्रकाश पडला आहे.

जा, तूं छपतछपत पाहिजे तेथें जा; तुझ्या पावलावर पावलें टाकून, तुझ्या मागोमाग येऊन, तूं कोण, कुठला, याचा तपास लावल्यावांचून मी राहणार नाहीं. [जातो.

---

## प्रवेश तिसरा.



स्थळः—बुद्धिसिंगाच्या तंबूपुढील जागा.

बुद्धि०:—( निशाणाचे कांहीं तुकडे हातांत घेऊन येतो व कनाथीवर टाकून चोहोंकडे पहात ) आतां असें करावें म्हणजे आग चोहोंकडे आपोआप पेटेल. घरावर नुसता निखारा ठेवून वारा वाहण्याची वाट पहात बसण्यांत फुशारकी नाहीं. निखाऱ्याच्या ज्वाळा पेटवणारा वारा प्रेमध्वजानें या छावणींत आणला आहे, त्याचा या वेळीं उपयोग केला पाहिजे. ( मोठयानें ) क्षया, क्षया, आहेस कोठें? अरे, तूं पहारा करीत आहेस का इकडेतिकडे भटकतो आहेस? क्षया, क्षया, ( पडद्यांत "जी, महाराज" ) असें नुसतें जी म्हणून काय उपयोगाचें? असा पुढें ये. मी मघांपासून पाहतों आहे; असा पुढें ये. ( क्षय येतो. ) आतां तुला एक आवाज नाहीं ऐकूं आला?

क्षय०:—नाहीं आला.

बुद्धि०—नाहीं कसा? येथें कोणी माझ्या तंबूच्या कनाथीवर कांहीं आणून टाकलें, तो आवाज मला ऐकूं आला. तूं शुद्धीवरच नव्हतास! हो तूं शुद्धीवरच नव्हतास. हें येथें पडलें आहे तर खरें—हें फाटलेलें फडकें आणि ही मोडलेली काठी कोणी आणून टाकली. बोल कोणीं आणून टाकली? बोल. माझा क्षय व्हावा म्हणून माझ्या शत्रूंनीं मजवर हें कुंभाड रचलेलें दिसतें; आणि तूं त्या चोरांना मदत करीत असला पाहिजेस.

बोल, कोणाचें निशाण फाडून माझ्या दारापुढें आणून टाकलेंस, बोल.

क्षय०:—मला काय ठाऊक कोणाचें तें. मी जरा बाहेर गेलों होतों खरा. ती वृद्धि दासी माझ्या ओळखीची, तिच्याशीं बोलत दोन पावलें गेलों. बायकांच्या नादीं लागलें म्हणजे संकटें येतात तीं अशीं. मी इतक्यांत परतून आलों तों माझ्या पुढेंच कोणसासा हें फडकें घेऊन आला.

बुद्धि०:—अरे गुलामा! तूं माझ्या कीर्तीला क्षयच लागलास म्हणायचा! उचल बघूं तें निशाण; कोणाचें आहे पाहूं! (क्षय उचलून निशाण पुढें करतो) गाढवा, हें उदेपूरचें निशाण–फाडून तुकडे तुकडे करून माझ्या तंबूपुढें टाकलेंस!

क्षय०:—महाराज, सरकार, मी नाहीं टाकलें. मी क्षय नांवाचा आहें, कृतीचा क्षय नाहीं.

बुद्धि०:—हें जर खरें असेल तर उचल तें निशाण, आणि गरुडध्वजाच्या छावणींत जाऊन त्यांना वर्दी दे, कीं कोणी दुष्टानें उदेपूरचें निशाण फाडून, रजपूत राजे व महाराणा प्रतापसिंह यांच्यामध्यें वैर पडावें म्हणून राजे बुद्धिसिंग यांच्या तंबूपुढें आणून टाकलें. जा, असा सगळ्या छावणींतून ओरडत जा. उचल ते तुकडे, उचल. ते तुकडे घेऊन मीं सांगितलें तसा ओरडत जा. धांवत जा–गरुडध्वजाकडे धांवत जा.

क्षय०:—(जातांना) क्षयाच्या गळ्यांत ही आगीची माळच पडली आहे आणि त्यामुळें मला तर लग्नवेळेसारखा आनंद होत आहे. हें भांडणाचें मूळच माझ्या हातांत आलें. एकेका शब्दानें एकेका छावणीला आग लावून देतों.

बुद्धि०:—क्षया, निरोप काय सांगायचा, काय ओरडत जायचें, तें ध्यानांत आलें ना?

क्षय०:—त्याची आपण काळजी करूं नका. निरोप सांगून मी परत

येण्यापूर्वीच क्षयाच्या बहादुरकीची बातमी सरकारच्या कानावर येईल. मी चोहोंकडे असा ओरडत जाणार,-अहो कोणी दुष्टानें उदेपूरच्या निशाणाच्या फाडून पार चिंध्या केल्या; आतां उदेपूरचा सिंह चवताळला म्हणजे फार भयंकर प्रसंग येईल; संभाळा, संभाळा. [ जातो.

बुद्धि०:—बराबर निखारे ठेवले, वाऱ्याला गतिहि दिली. आतां प्रतापसिंहाचें शांतवन करण्याचे वेळीं हजर राहून प्रेमध्वजाबद्दल दोन-चार खोटे अश्रू ढाळण्यापलीकडे मला काम उरलें नाहीं! [ जातो.

---

## प्रवेश चवथा.

स्थळ:—पद्मावतीचा तंबू.

पद्मा०:—या बुद्धिसिंगाची ब्याद माझ्या मागची सुटली म्हणजे कटकट मिटली.—गरुडध्वजाचा आचरटपणा माझ्या पथ्यावरच पडला म्हणायचा; तसाच बुद्धिसिंगाचा पडो म्हणजे झालें. त्या बुद्धिसिंगाला म्हणावें माझी बेअदबी करायला या तंबूंत तर ये,—

[ राणी व दासी प्रवेश करतात.

राणी०:—वन्सं, अशा रात्रीच्या वेळीं कोणाला तंबूंत बोलावण्याचा विचार चालला आहे? तंबूंत या, असा निरोप कोणाला पाठविणार आहां? वन्सं, इतकें कांहीं लाजायला नको. उपवर झालेल्या राजकन्यांना असले प्रेमाचे डोहाळे होत असतात. तुम्हीं त्या दिवशीं देवीच्या देवळांत प्रेमध्वजाच्या अंगावर हार टाकला; आज त्यांनीं मोठा पराक्रम करून दाखविला; आणि स्वारीच्या तोंडून असे शब्दहि निघाले कीं ताईचा नवरा व्हायला लायक सरदार एवढाच दिसतो!

पद्मा०:—खरेंच का दादा असें म्हणाला?

**राणी०:**—खरेंच म्हणून काय विचारतां ? वन्सं, ही दासी देखील त्या वेळेला हजर होती. त्या वेळीं म्हणणें झालें कीं याच्या पराक्रमाची जशी आज पारख झाली तशी याच्या सत्त्वाचीहि मी एक दिवस परीक्षा घेईन, आणि नंतर पद्मावतीविषयींच्या त्याच्या प्रेमाला उत्तेजन देईन. नाहीं ग असेंच म्हणणें झालें, नाहीं ?

**पद्मा०:**—खरेंच का ग ? हें सगळें खरेंच का ग ?

**दासी०:**—होय ताईसाहेब ! सरकारच्या तोंडचे शब्द आतां राणीसाहेबांनीं जसेच्या तसेच उच्चारले.

**राणी०:**—म्हणूनच म्हणतें, ताईसाहेब, बसलें असतांना, जागें असतांना, फिरत असतांना, आपणाला पडणाऱ्या प्रेमाच्या गोड स्वप्नांत माझ्या या येण्यानें व्यत्यय तर नाहीं ना आला ? खरें खरें सांगा वन्सं, तंबूंत कोणाला बोलावून आणण्याचा विचार होता ?–मीं आतां सांगितलें तर मला मनकवडीच म्हणाल. बाकी तुमच्या मनांत आतां जें करावेसें आलें आहे तेंच मीं केलेलें आहे; आणि तें तुम्हांला कसें काय आवडतें तें पहाण्याकरितां मी येथें आलें आहे.

**पद्मा०:**—काय केलें आहेत राणीसाहेब ? दादाला का इकडे बोलावलें आहेत ? आणि मघांचे ते शब्द त्याच्या तोंडून मला ऐकविण्याची का तुमची इच्छा आहे ?

**राणी०:**—नाहीं ओळखलेंत–बाकी ओळखलें असेल–लाजण्याचें ढोंग करून बोलून दाखवीत नसाल झालें ! तिकडून काय बोलणें झालें, काय करणें झालें, या बातम्या दासीनें तुम्हांला केव्हांच सांगितल्या असतील; आणि तें सगळें समजल्यावर आपल्या आवडत्या भावाला भेटून आल्याशिवाय कोणची लाडकी बहीण राहील ? सांगा, खरें सांगा वन्सं; तुम्हांला हें सगळें अगोदर समजलें होतें कीं नाहीं ? तुम्ही भेटून आलां कीं नाहीं ? प्रेमध्वजाबद्दल गोष्टी निघाल्या होत्या कीं नाहीं ? कसें पण

ओळखलें! होय ना? निघायच्याच त्या गोष्टी. तुम्ही किती लपवून ठेवा, समजलां वन्सं; लाजेचे पडदे झिरझिरीत असतात आणि लपवून ठेवलेल्या विकारांवर व विचारांवर पांघरूण घालण्याचें त्याच्या अंगीं सामर्थ्यच नसतें. अहो वन्सं, या प्रेमाच्या खेळांत खेळलेलीं सवरलेलीं माणसें आम्ही; आमच्यापासून तुम्ही काय लपवून ठेवणार!

**पद्मा०:**—चोरांचीं पावलें चोरच ओळखूं शकतात.

**राणी०:**—हें एक तर माझें बरोबर आलें; आणि आतां दुसरें ऐकलेंत म्हणजे तुम्ही तर माझें कौतुकच करीत राहाल. आतां सांगितल्या या गोष्टी कोणालाहि अंदाजानें सांगतां येतील; पण दुसरें तुम्ही ऐकलेंत म्हणजे म्हणाल, कीं माझींच स्वप्नें यांना बरोबर कशीं पडलीं?

**पद्मा०:**—पण तें दुसरें काय तें तर समजूं दे.

**राणी०:**—प्रेम कसोटीला उतरतें कीं नाहीं हें पाहण्याकरितां तुमचें मन या वेळीं उतावीळ झालें असलें पाहिजे—हो, असेंच असलें पाहिजे—आणि म्हणून मीं प्रेमध्वजाची परीक्षा पाहण्याकरतां एक युक्ति योजिली आहे. आणि ते या कसोटीला कितपत उतरतात हें पाहण्याकरितां मी येथें आलें आहें. आतांच्या या कसोटीला प्रेमध्वज उतरले म्हणजे थोड्याच दिवसांत ते तुमचे झालेच म्हणून समजा. कांहीं काळानें तिकडून प्रेमध्वजाच्या सत्त्वाची कसोटी पाहण्यांत येण्यापेक्षां मीं आजच त्यांची कसोटी पाहिली तर त्याबद्दल, वन्सं, तुम्ही मला शाबासकीच नाहीं का देणार? म्हटलें, कसोटी पाहण्याला उशीर कशाला? आतांच कसोटी पाहावी. वन्सं, आतां जी मी तुमच्या तंबूंत आलें आहें ती त्या कसोटीला प्रेमध्वज कितपत उतरतात, हें इतक्यांत समजायचें आहे म्हणूनच हो.

**पद्मा०:**—पण कोणची ती कसोटी?

**राणी०:**—निशाणाचें रक्षण करण्याकरतां त्यांना नेमलें आहें; अशी ही

जबाबदारीची कामगिरी अंगावर घेतलेली असतांना येथें येण्याविषयीं तुमच्या नांवानें निरोप पाठविला आहे—

**पद्मा०**:—माझ्या नांवानें काय म्हणून ?

**राणी०**:—ऐकून तर घ्या. निरोप ऐकून जर ते येथें आले तर उदेपूरच्या राजकन्येचें पाणिग्रहण करण्यास—

**पद्मा०**:—ते लायकच नाहींत—

**राणी०**:—असें आम्ही समजूं. आणि जर आले नाहींत तर कसोटीला ते उतरले, असें होईल.

**पद्मा०**:—पण माझ्या नांवानें म्हणजे कसा निरोप पाठविला आहेत ?

**राणी०**:—कसा म्हणजे ? कसा तें सांगतें; पण अगोदर तुमच्या हातांतली ती नेहमींची अंगठी—ती मुद्रिका—दाखवा पाहूं !

**पद्मा०**:—( बोटांत अंगठी नाहीं असें पाहून ) हें काय ! वहिनी, माझी अंगठी काय झाली ? तुमचा निरोप कळवायला माझ्या हातांतली अंगठी गेली आहे काय ? तुमचा निरोप ती मुद्रिका बोलणार आहे कीं काय ? सांगा, मला खरें खरें सांगा.

**राणी०**:—हो असेंच. तुम्ही थोड्या वेळापूर्वी माझ्या तंबूंत आलां होतां, तिथें ती आंगठी—ती मुद्रिका—विसरून गेलां. ती पाहिल्यावरच मला ही युक्ति सुचली. कां, बरोबर युक्ति योजली कीं नाहीं परीक्षा पाहायला ?—हां !—कां अशा तुम्ही कावऱ्याबावऱ्या कां ?

**पद्मा०**:—वहिनी, काय सांगूं, तूं भलतेंच केलेंस ! मला तरी प्रथम विचारायचें होतेंस. ती मुद्रिका पाहिल्यावर ते धांवत आलेच—

[ वृद्धि येते.

**वृद्धि०**: —आलेच ते राणीसाहेब. प्रेमाची गति निरोपाच्या पायाहून अधिक वेगाची असते. हे पहा आलेच. [ प्रेमध्वज येतो.

**प्रेम०**:—कोठें आहे तो दुरात्मा बुद्धिसिंग? उदेपूरच्या राजकन्येचा अपमान करणारा तो माझा शत्रु कोठें आहे? बुद्धिसिंगा, असा लपून कां बसतोस? तुला द्वंद्वयुद्धाची खुमखुमी आहे नव्हे? ये, असा बाहेर ये. राजकन्येशीं—पद्मावतीसारख्या तरुणीशीं कसें विनयानें, अदबीनें, वागावें हैं द्वंद्वयुद्धांत तुला शिकविण्याकरितां ही माझी तलवार कशी उत्सुक झाली आहे. काय, तूं येत नाहींस पुढें?—राणीसाहेब, मला येतांना पाहून तो भित्रा येथून पळून गेला काय?—पद्मावती, त्या भित्र्यानें येथून पळून जाण्या पूर्वीं मी विद्युद्वेगानें येथें येऊन पोंचलों नाहीं, याबद्दल मला क्षमा कर. पद्मावती, सांग, सांग कोठें तो नराधम गेला? प्रत्यक्ष महाराणा प्रतापसिंह यांच्या छातीची ढाल करून जरी त्याच्या आड तो लपून बसला तरी तुझ्या पायाशिवाय त्याचें रक्षण करण्यास कोणीहि समर्थ नाहीं, हें त्याला समजावून देण्यास मी चुकणार नाहीं.—तुम्ही सर्वजण अशा मुक्या कां? अशा गप्प कां? कोणी तरी बोला.

**पद्मा०**:—महाराज, आमच्या हातून भयंकर अपराध घडला असून—बुद्धिसिंग—आपली चुकीची समजूत—आम्हीं जाणूनबुजून कांहीं आपल्याला फसविलेलें—असे रागानें पाहूं नका—बुद्धिसिंग आलाहि नाहीं—आणि—

**प्रेम०**:—मग मला कशाला बोलावून आणलें? ही मुद्रिकेची खूण कां पाठविण्यांत आली? पद्मावती, तुझा व माझा संकेत ठरलेला तुला आठवत नाहीं काय? ही मुद्रिकेची खूण पाहिली म्हणजे तुझ्या अब्रूचें रक्षण करण्याकरतां मीं धांवत आलें पाहिजे, असेंच ठरलें होतें ना?

**पद्मा०**:—होय. तें सगळें खरें, पण राणीसाहेबांनीं चुकून आपल्याकडे ती मुद्रिका—

**राणी०**:—आपल्या प्रेमाची कसोटी पाहण्याकरितां पाठविली.

**प्रेम०:**—माझ्या प्रेमाची कसोटी ? माझ्या प्रेमाची कसोटी ! परीक्षाच जर पाहावयाची होती तर ती अशा रीतीनें कशाला पाहिली ? रणांगणावर मी कोणच्या कसोटीला उतरलों नाहीं ? काल निशाणाजवळच्या युद्धांत मी कोणच्या कसोटीला उतरलों नाहीं ? असें कोणचें साहसाचें काम मला सांगण्यांत आलें, आणि तें करतांना माझे पाय कचरले ?

**राणी०:**—आपण कसोटीला पुरे उतरलां आहां, आणि या प्रसंगीं तर मुद्रिकेचा संकेत मला माहीत नसल्यामुळें माझ्या हातून चुकी झाली आहे. प्रेमपाशांत विशेष अडकल्यामुळें रणमैदानावरील कामगिरी सोडूनहि ताईसाहेबांच्या दर्शनाला आपण याल कीं काय, हें पाहण्याची अवदसा—

**प्रेम०:**—होय, उदेपूरच्या निशाणाला सोडून मी प्रेमांध होऊन ह्या ठिकाणीं आतां आलों. महाराणीसाहेब, ज्यांना या मुद्रिकेची गोष्ट माहीत नाहीं त्यांच्या दृष्टीनें एक प्रकारें प्रेमांध, नादान, उल्लू मी ठरलों— पद्मावती, पुरुषांच्या मनाची परीक्षा तुम्हांला वाटेल तशी या वेळीं करा; पण एवढी गोष्ट मात्र खरी कीं तुम्ही बायका मात्र या वेळीं माझ्या परीक्षेला उतरलां नाहीं. राणीसाहेब, तुम्हांला असें का वाटलें, या धर्मयुद्धांत रणमैदानावर शत्रूशीं तोंड देऊन झुंझत असलेल्या आपल्या देशाच्या झेंड्याला सोडून प्रेममंदिराकडे धांव घेणाऱ्या सरदारांपैकीं मी एक आहें ?—पुरुष स्वभावतः नादान नसले तरी स्त्रियांच्या चंचलतेला बळी पडून नादान होण्याचा संभव असतो; आणि पद्मावती, असल्या चंचलतेच्या नादान पायावर जर तुझ्या प्रेमाचें मंदिर उभारलेलें असेल, तर या ठिकाणीं मला एक क्षणभरहि अधिक रेंगाळत राहावयास नको. परस्परांची परीक्षा ही इतकी पुरी झाली. तुझ्या या चंचलतेला बळी पडून, सर्व छावणींत माझी छीः थू होऊन, प्रतापसिंहाच्या रोषाला मी पात्र होण्याचा संभव आहे. यासंबंधानें दैवाची परीक्षा पाहण्याकरितां मला निशाणाजवळ लवकर

गेलें पाहिजे.—काय, माझें दैव या वेळीं मला प्रतिकूल आहे का ? पायांतला उत्साह कसा एकाएकीं नाहींसा झाला ! पायांनो, येतांना तुम्हीं मला विजेच्या वेगानें वाहून आणलेंत आणि जातांना असे जड कां ? स्त्रियांच्या अब्रूचें पारडें जड करण्याकरतां तुम्ही त्या वेळीं चंचल झालां; पण त्या चंचल स्वभावाच्या आहेत असें पाहून तुम्हांला जड व्हावेंसें वाटतें का ! कष्टानें कां होईना, पायांनो, हला या जागेवरून, आणि न्या मला माझ्या दैवाच्या परीक्षेच्या ठिकाणीं. [ जातो.

**पद्मा०:**—राणीसाहेब, काय हें केलेंत ? त्यांची परीक्षा पाहण्याचें एका बाजूला राहून मी मात्र त्यांच्या मनांतून उतरलें; आणि शिवाय आतां ते म्हणत होते त्याप्रमाणें—( क्षय पडद्यांत ओरडतो ) खरोखरच दुर्दैव ओढवलें म्हणायचें वहिनी, मी त्यांच्या प्रेमांतून जरी उतरलें तरी लांबून त्यांच्याकडे पाहात आयुष्य कंठीन, पण आतांच्या या दुर्दैवानें दादाचा राग जर त्यांच्यावर झाला तर माझ्यामुळें,—राणीसाहेब, तुमच्या चुकीमुळें—प्रेमध्वज, ही अभागी पद्मावती प्रेमानें तुमचें आयुष्य सुखी करण्याच्या ऐवजीं तुमच्या कीर्तीला डाग लावून दादाच्या हातून तुम्हांला मरण येण्यास कारण होणार ना ? [ मूर्छित पडते.

## अंक तिसरा समाप्त.

# अंक चवथा.



## प्रवेश पहिला.



**स्थळ**—छावणींतील रस्ता. क्षय प्रवेश करतो.

**क्षय०**:—अहो, उदेपूरच्या निशाणाच्या कोणीं दुष्टानें फाडून पार चिंध्या केल्या, आतां उदेपूरचा सिंह ही बातमी ऐकून चवताळला म्हणजे भयंकर प्रसंग येईल. संभाळा–संभाळा. ( हंसत चोहोंकडे पाहात. ) कशी मजा आहे ! मीं असाच ओरडत ओरडत राजे मानसिंगाच्या तंबूपुढून आतांच गेलों तों ते व त्यांचे सरदार प्रतापसिंहाची खोड मोडली म्हणून लागले लगेच मजा करायला ! आतां आली आमचे नवे जुने धनीसाहेब यांची पाळी. ( पूर्वोक्त ओरडतो. मद्याचा पेला व सुरई घेऊन झिंगलेला गरुडध्वज प्रवेश करतो. )

**गरु०**:—ही बातमी सांगायला तुला कोणीं पाठविलें ?

**क्षय०**:—कोणीं म्हणजे ? बुद्धिसिंगजींनीं.

**गरु०**: —तो बुद्धिसिंग इतका निर्बुद्ध कसा ? असली आनंदाची बातमी मला कळविण्याकरतां त्यानें तुला रिक्त हस्तानें कसें पाठवलें ? मदिरेचीं दोन चार पिपें पुढें पाठवून देऊन नंतर ही आनंदाची बातमी मला कळवायला पाहिजे होती. मला वाटलेंच होतें कीं या प्रतापसिंहाच्या निशाणाचा असा नाश होणार; म्हणून मी अगोदरपासून दारू पीत पीत बातमीची वाट पहात असा बसलों होतों ! जा, बुद्धिसिंगाला सांग, हा गरुडध्वज तुमच्याहून अधिक बुद्धिमान आहे. पण थांब, तूं ही अशी आनंदाची बातमी मला कळविलीस याबद्दल तुला कोणचें बक्षीस देऊं ? चल, माझ्या

तंबूंत चल. तुझ्याइतक्या उंच दारूच्या पिंपांत पाहिजे तर तुला सोडून देतों. एखाद्या तळ्यांत माशानें जसें पोहावें त्याप्रमाणें दारूंत तुला विहार करण्याची इच्छा आहे काय ? चल, माझ्या तंबूंत चल; तुझी ही हौस मी पुरवतों.

क्षय० —हें बक्षीस घेण्याकरितां धन्याचे पाय पाहायला मी लवकरच परत येईन. मला प्रतापसिंहाच्या छावणीला माझ्या तोंडांतून निघणाऱ्या ज्वालांनीं प्रथम पुरती आग लावूं दे. [ पूर्वोक्त ओरडत जातो.

गरु०:—अखेर जय मलाच मिळाला ! आतां सगळ्या सरदारांना बोलावून त्यांना दुसरेंतिसरें कांहींहि खाऊं न घालतां प्रथमपासून अखेरपर्यंत नुस्त्या दारूच्या पक्वान्नांवर हात मारायला अशा आनंदाच्या प्रसंगीं सांगितलें पाहिजे. [ जातो.

## प्रवेश दुसरा.

( प्रेमध्वज मोडलेल्या निशाणाजवळ उभा आहे. )

प्रेम०:—अखेर माझीं सर्व दुष्ट स्वप्नें खरीं ठरलीं अं ! दैवानें तरी मला अनुकूल कां असावें ? हें निशाण सोडून जाण्याची मला दुर्बुद्धि झाल्यानंतर दैवाच्या आणि देवाच्या पाठिंब्याची मीं इच्छा कां धरावी ? दैवा, तूं माझ्या मदतीला धांव म्हणून मी तुझी प्रार्थना या वेळीं करीत नाहीं; या संकटांतून मला सोडीव म्हणून, देवा, मी तुझी या वेळीं करुणा भाकीत नाहीं. ज्या दुष्ट बुद्धीनें हें दुष्कृत्य केलें त्याच दुष्टबुद्धीला हात जोडून मी या वेळीं विनंति करतों, निशाणाप्रमाणें माझ्या देहाचाहिं नाश गुपचुप या वेळीं तुझ्या हातून होऊं दे, म्हणजे माझें हें काळें तोंड रजपूत छावणींत कोणाच्याहि दृष्टीस तरी पडणार नाहीं. [ हकीम येतो.

हकी०:—प्रेमध्वज, असे निराशेचे उद्गार शूरांना शोभत नसतात.

प्रेम०:—कोण, हकीमसाहेब! तुमच्या हातून मला या वेळीं कसची मदत होणार? माझ्या शरीरावर जर एखादा वार झाला असता तर तुमच्या मदतीचा मला उपयोग होता. या निकोप शरीराला तुम्ही काय करणार? अब्रूला लागलेला कलंक धुवून टाकण्याचें सामर्थ्य वनौषधींत नसतें हें, हकीमसाहेब, मी आपणाला सांगण्याची जरुरी नाहीं.

हकी०:—वनौषधीनें असली जखम भरून येत नसते हें मला माहीत आहे. सज्जनांच्या सहवासांत घालविलेला काळच असल्या दुःखावरचें मुख्य औषध होय, आणि तेंच औषध, प्रेमध्वज, तुम्हांला देण्याकरतां मी या वेळीं आलों आहें.

प्रेम०:—ज्या काळाचा अनुभव जिवंत राहण्यानें मनुष्याला मिळतो त्याच्या अंगीं मला बरें करण्याचें सामर्थ्य आहे, असें मला वाटत नाहीं; मृत्यूच्या वेळीं ज्या काळाचें दर्शन मनुष्याला होतें तोच एकटा काळ माझा रोग बरा करणारा वैद्य होय. हकीमसाहेब, निर्मळ प्रेमपाशांत सांपडल्यामुळें कर्तव्यापासून पराङ्मुख होण्याच्या चुकीबद्दल हें असलें—ध्वजाचा नाश करून सूड उगविण्याचें—शासन करण्यास ज्या छावणींतले दुष्ट लोक बिल-कूल कचरत नाहींत, त्या छावणींत सज्जनांचा सहवास मला कोठून घडणार! प्रणांत चोंच खुपसण्यास टपून बसणाऱ्या कावळ्यांच्या सहवासापेक्षां मृत्यु बरा नाहीं का?

हकी०:—पृथ्वीवर अद्याप सज्जन आहेत, पृथ्वीकडे देवानें पाठ फिरव-लेली नाहीं.—प्रेमध्वज, मजबरोबर मोंगलांच्या छावणींत चला, तेथें तुम्हांला सज्जनांचा सहवास घडेल.

प्रेम०:—हं; मोंगलांच्याकडे देवानें पाठ फिरवलेली नसेल, पण आम्हां रजपुतांकडे तरी फिरवली आहे ना? रजपुतांकडे देवानें पाठ फिरविल्यानंतर जगून तरी काय करायचें?—हकीमसाहेब, रजपुतांची छावणी सोडून

लपूनछपून मी तुमच्याबरोबर मोंगलांच्या छावणींत पळून येऊं असेंच ना तुमचें म्हणणें ? राणा प्रतापसिंहाला बरे करणारे हकीम जर तुम्ही नसतां, तर असल्या प्रसंगींहि रजपुतांशीं निमकहरामपणानें वागण्यास सांगणाऱ्या मित्राचें शासन ही प्रेमध्वजाची तलवार कोणच्या प्रकारें करीत असते, याचा तुम्हांला अनुभव मिळाला असता; जा, तुम्ही माझ्या पुढून जा. माझ्या मलीन झालेल्या अब्रूकरितां रजपुतांच्या हातूनच वीराप्रमाणें मला मेलें पाहिजे. महाराणा प्रतापसिंह मला जी शिक्षा सांगेल ती मी निमूटपणें सोशीन. मी जर या वेळीं तुमच्या उपदेशाप्रमाणें पळून जाऊन आपले प्राण वांचवले, तर या जन्माचा शेवट बेअब्रूत जसा होणार तसाच पुढील कित्येक जन्मांचाहि शेवट बेअब्रूतच झाल्यावांचून राहणार नाहीं. जा येथून. चालते व्हा.—काय, तुम्ही निघून जात नाहीं ! माझ्या दुःखावर डागण्या देण्यासाठीं येथें उभे राहतां ?

हकी०:—प्रेमध्वज, तुमची अब्रू अधिक मलीन व्हावी अशी माझी बिलकुल इच्छा नाहीं. मी या ठिकाणीं उभा राहिलों आहें तो एवढ्याचसाठीं, प्रतापसिंहाचे लोक या ठिकाणीं येऊन जर महाराण्याच्या हातून एखादी अविचाराची गोष्ट होऊं लागली—

**प्रेम०:**—नका, अशा वेळींहि तुम्ही माझ्या शेजारीं उभे राहूं नका. हकीमसाहेब, तुम्ही जर या वेळीं मजबरोबर प्रतापसिंहाच्या दृष्टीस या ठिकाणीं पडलां तर उदेपूरचा तो चवताळलेला सिंह माझ्याबरोबर तुमचाहि अविचारानें एकदम प्राण घेण्यास मागें पुढें पहाणार नाहीं. कोणाची तरी आहुति त्याच्या संतापाला या वेळीं पडली पाहिजे. जा, हकीमसाहेब, तुम्ही जा. मला एकट्यालाच माझ्या मृत्यूची भेट घेऊं द्या. दुःख सोसायच्या वेळीं आप्त इष्ट जर जवळ असले, आणि आपल्या दुःखाचा वाटा त्यांनाहि मिळण्याची जर भीति वाटत आली, तर दुःखाच्या वेदना अधिक तीव्र होतात. म्हणून

म्हणतों, हकीमसाहेब, जें कांहीं व्हावयाचें असेल तें माझ्या एकट्याचें होऊं द्या. तुमचा संशय प्रतापसिंहाला आल्यावांचून राहणार नाहीं. माझ्या हातून झालेली चूक माझ्याशिवाय इतर कोणालाहि बाधली नाहीं एवढें तरी समाधान, मरायच्या वेळेला, माझ्या मनाला नको का? जा, मरणापूर्वी स्वस्थ चित्तानें मला कांहीं काळ घालवूं द्या.

हकी०:—( स्वगत ) थोडा वेळ याला एकट्यालाच येथें राहूं देणें, हेंच या वेळीं इष्ट आहे. [ जातो.

प्रेम०:—माझ्या चुकीमुळें माझ्या आप्तेष्टांच्या जिवाच्या यातना होणार नाहींत, एवढी तरी खबरदारी मला मरणापूर्वी घेतली पाहिजे. मनुष्याचा अर्धा जीव त्याच्या स्वतःच्या शरीरांत असतो; आणि अर्धा जीव आप्तेष्टांच्या शरीरांत असतो. जोधपूरला पळून जाऊन हें काळें तोंड जर बाबांना दाखविलें,—या अर्ध्या जिवाचें मरण नामर्दपणानें चुकविल्यामुळें बेअब्रूच्या नरकांत कुचंबत पडणाऱ्या त्या अर्ध्या जिवाच्या मृत्युसमयींच्या वेदना माझ्यानें कशा पाहवतील!—मोंगलांच्या छावणीकडे धांव घेऊं अं! माझा सगळा जीव पद्मावतीच्या शरीरांत खेळत राहिला आहे; पळपुट्याच्या अपयशामुळें त्या जिवाला लोक तृणवत् तुच्छ मानणार नाहींत काय? त्या जिवाचें हास्य – त्या जिवाचें तेज—त्या जिवाचें प्रेम—माझ्या बदनामीनें काळें कुळकुळीत पडणार नाहीं काय?—प्रतापसिंहाच्या क्रोधाला प्रेमध्वजा, तूं आपली आहुति निमूटपणें दिली पाहिजे, तरच या शरीराच्या आंतील नाहींत तर निदान बाहेरचीं तरी दुःखें तुला टाळतां येतील.—प्रतापसिंहा, ये रागानें चवताळून ये, आणि उदेपूरच्या ध्वजाच्या या मोडलेल्या काठीपुढे निश्चल उभा असलेल्या या प्रेमध्वजाच्या शरीरयष्टीचे कट्कन् दोन तुकडे करण्याचा हुकूम तुझ्या सेवकांना कर. मरणापूर्वी मी एकच विनंति करीन, कोणीं कांहींहि सांगितलें तरी पद्मावतीकडे काडीचीहि चूक नसून त्या साध्वीच्या अब्रूसंबंधानें स्वप्नांतहि शंका घेऊं नका. माझ्या चुकीमुळें

ित्री बेअब्रू झाली नाहीं एवढें जर मीं मिळविलें, तर माझ्या अब्रूची काळजी— [ प्रतापसिंह व सरदार येतात.

प्रता०:—तुझ्या अब्रूची काळजी! उदेपूरच्या निशाणाचे असे तुकडे तुकडे झाल्यावर तुझी अब्रू कशी शिल्लक राहील? (पट्यांत क्षय ओरडतो) हे पाहा, आमच्या निशाणाच्या अब्रूचे असे धिंडवडे सगळ्या छावणीभर चालले आहेत; आणि अशा वेळीं तुला तुझ्या अब्रूची काळजी अं! धरा, याच्या मुसक्या बांधा. (सरदार तसें करितात) उदेपूरच्या निशाणाची काठी ज्या ठिकाणीं पुरली होती त्या ठिकाणीं तुझ्या शरीरांतील हाडेंन्हाडें काढून पुरल्याशिवाय मी आज शांत व्हावयाचा नाहीं. या निशाणाचे जितके तुकडे झाले असतील तितके तुकडे तुझ्या शरिराचे झाले पाहिजेत. हा ध्वज जितक्या ठिकाणीं फाटला असेल तितक्या ठिकाणीं तुझ्या शरीराचें कातडें सोलून तुझे हालहाल केल्याशिवाय उदेपूरच्या बेअब्रूची भरपाई होणार नाहीं.—प्रेमध्वजा, खरोखर सांग, तूं खरा रजपूत असशील तर खरें खरें सांग—माझी अशी बेअब्रू करण्यास तुला पाठिंबा कोणाचा आहे?—सर्व राजसभा तुझ्या बाजूची असूं दे, तुझी जी गत तीच गत सर्वांची केल्याशिवाय मी राहणार नाहीं.

प्रेम०:—महाराज, मी मरणाला भीत नाहीं. आपण आतां ज्या प्रकारची शिक्षा सांगितली त्याहून अधिक क्रूरपणाची शिक्षा आपण मला खुशाल द्या. उदेपूरच्या निशाणाचे हे असे तुकडे झाले—

प्रता०:—ते कसे झाले? त्या वेळीं तूं काय करीत होतास? निशाणाच्या संरक्षणाला तुला मीं नेमलें तें याचकरितां का? अरे भित्र्या—पण तुला मी भित्रा तरी कसा म्हणूं? तुझें शौर्य मी डोळ्यांनीं पाहिलें आहे. बोल, प्रेमध्वजा बोल. तुझ्या शरीरावर एकहि वार कसा नाहीं! तुझ्या अंगावर रक्त कोठेंहि कसें दिसत नाहीं?—दगलबाजा, नराधमा, विश्वासघातक्या, परमेश्वरानें तुला भित्रा केला असता तरी बरें झालें असतें!

प्रेम०:—महाराज, जसा मी भित्रा नाहीं तसा दगलबाजहि नाहीं, हें आपणाला पक्कें माहीत आहे. दगलबाजी आम्हां शूर रजपुतांना माहीत नसते.

प्रता०:—मग या निशाणाचे तुकडे कसे झाले ?

प्रेम०:—मी भित्राहि नाहीं आणि दगलबाजहि नाहीं, हें सिद्ध करण्याकरितां या जागीं व या क्षणीं मी आपण सांगाल ती कडक शिक्षा भोगायला तयार आहें. क्रूर मृत्यूच्या त्या वेदना सोशीत असतांना जर भीतीनें माझ्या डोळ्याचें पातें किंचितूहि हालवलें, किंवा एखाद्या दगलबाज नसेनें घाव चुकविण्याकरितां थोडेसेंहि जर अंग चोरलें, तर या भित्र्या नीच शरीराचें शव अग्नीच्या स्वाधीन न करतां कावळ्यांना—कोल्ह्याकुत्र्यांना—खाऊं घाला. माझ्या सच्चेपणाची व खऱ्या रजपूत बाण्याची परीक्षा या क्षणीं घ्या.

प्रता०:—हें निशाण मोडलें त्याच वेळीं तुझी परीक्षा झाली. बोल, प्रेमध्वजा, बोल; हें निशाण मोडलें गेलें त्या वेळीं हा सच्चा रजपूत कोणचें शौर्याचें, कोणचें नेकीचें काम करण्यांत गुंतला होता ?

प्रेम०:—महाराज, बुद्धिसिंगाशीं द्वंद्वयुद्ध करण्याचें तें काम मोठ्या शौर्याचें होतें असें मला वाटलें नाहीं; पण नेकीचें होतें, अब्रूचें होतें, प्रेमाचें होतें.

प्रता०:—निशाणाचा पहारा सोडून द्वंद्वयुद्धाला तुला कोणीं बोलावलें ? ही जागा सोडून जायला तुझे हात पाय धजले कसे ?

प्रेम०:—ती हकीकत सांगायला मी तयार नाहीं. साक्षीपुराव्यामुळें आपण मला सच्चा म्हणूं नका; सच्चा पुरुषाप्रमाणें जर मीं मरणाला कवटाळलें तरच पद्मावतीला कळवा, प्रेमध्वज सच्चा रजपूत होता.

प्रता :—पद्मावतीला ? पद्मावतीला काय म्हणून ?—अरे चोरा, स्वतःच्या बेअब्रूंत उदेपूरच्या घराण्यांतील बायकांचीं नांवें गुरफटून टाकून माझ्या बहिणीची नालस्ती होईल अशी मला भीति घालूं पाहतोस काय ?

—प्रेमध्वजा, तुला मरण्याची शिक्षा हा प्रतापसिंह सांगत आहे आणि तूं शूराप्रमाणें जरी मृत्यूची गांठ घेतलीस तरी कोल्हाकुत्र्यांकडूनच तुझ्या शवाचे लचके लचके तोडविण्यांत येतील हें पक्कें समज.

प्रेम०:—महाराज, ही शिक्षा मी निमूटपणें सोसतों. पद्मावतीसंबंधानें मात्र मला इतकेंच सांगायचें आहे, तिच्याइतकी निष्कलंक एकहि देवता आकाशांत आपणास पाहावयास मिळणार नाहीं. पद्मावती शुद्ध आहे, रात्रीं अपरात्रीं आपल्या तंबूंत तिनें मला बोलावलें असलें तरी तिचा काडीचाहि दोष नाहीं; पद्मावती—

प्रता०:—पुन्हां पद्मावती ! पद्मावती, पद्मावती, तिचें नांव उच्चारण्याला तुझी जीभ कशी धजते ! मरणापूर्वी अगोदर तुझी जीभ छाटून टाकतों;—

प्रेम०:—माझी जीभ छाटली गेल्यानंतरहि प्रेमाच्या जीवानें सर्वांना असें सांगत सुटेल कीं सर्व अपराध प्रेमध्वजाचा असून पद्मावती निष्कलंक—

प्रता०:—पद्मावतीवरील तुझ्या प्रेमाचें हें चऱ्हाट ऐकून तुला जीवदान देण्याइतका हा प्रतापसिंह अजागळ नाहीं.

प्रेम०:—पद्मावती खरोखर निष्कलंक—

प्रता०:—न्या, याला येथून एकदम न्या. याच्या तोंडचा एक शब्द मला ऐकायला नको. उदेपूरच्या निशाणाचीच केवळ नव्हे तर आमच्या घराण्यांतील बायकांचीहि अब्रू मरण्यापूर्वी हा चोर घेऊं पाहतो आहे. जा, याला घेऊन जा. तुझ्या तोंडचा मी एक शब्दहि ऐकणार नाहीं. उद्यां राजसभा बोलावतों, तुझे मदतगार पाठिंबे कोण आहेत याचा शोध घेतों, आणि आजच्या रात्रींच्या ज्या घटकेनें उदेपूरच्या निशाणाचे तुकडे तुकडे झालेले पाहिले उद्यांच्या रात्रीच्या त्याच घटकेला तुम्हां सर्व चोरांच्या शरीराचे तुकडे या ठिकाणीं झालेले पहावयास लावतों. [ पडदा पडतो.

---

## प्रवेश तिसरा.



( दोन दासी प्रवेश करतात. )

**प० दा०:**—बरी भेटलीस ! तूं कुणीकडे चाललीस ?

**दु० दा०:**—बरी भेटलीस; तुझ्याच बाईसाहेबांचें दर्शन घ्यायला निघालें. तुझें दर्शन झालें तेव्हां तुझ्या बाईसाहेबांचें दर्शन झाल्यासारखेंच आहे. तूं कुठें चाललीस ?

**प० दा०:**—मी तुझ्या बाईसाहेबांचें दर्शन घ्यायला निघालें. बरें झालें, या इथें तुझ्या रूपानें बाईसाहेबच मला भेटल्या.

**दु० दा०:**—बरेंच; अशी अर्धी वाट चालून होते न होते तों जर सर्व कामें आपोआप पार पडूं लागलीं तर किती तरी चांगलें होईल. तूं भेटलीस, बरें झालें; माझा पद्मावती ताईसाहेबांच्या तंबूपर्यंतचा हेलपाटा तरी वांचला.

**प० दा०:**—आणि माझा राणीसाहेबांच्या तंबूपर्यंतचा हेलपाटा वांचला. मला वाटतें महाराण्यांनीं त्या सरदाराला दिलेली शिक्षा अंमलांत येऊन त्याच्या मरणाच्या दुःखाचा विसर ताईसाहेबांना पडेपर्यंत महाराणीसाहेबांच्या तंबूपर्यंत किती हेलपाटे घालावे लागतील कोण जाणें.

**दु० दा०:**—अग, ही शिक्षा त्या सरदारांना झाली नसून तुम्हां आम्हां दासींनाच झाली आहे असें समजलें पाहिजे. माझे पाय कसे अगदी दमून गेले आहेत. तेव्हां तूं अशीच मेहेरबानी वरचेवर करीत जा आणि अर्ध्या वाटेंतच वरचेवर भेटत जा.

**प० दा०:**—तूं देखील अशीच अर्ध्या वाटेंत भेटत जा. तूं जर वेळच्या वेळीं भेटली नाहींस तर मी इथें अर्ध्या वाटेवर येऊन तुझी वाट पाहात बसेन आणि तुझी गांठ पडल्यानंतरच परत जाईन.

दु० दा०:—तर मग हें तुझें आमचें ठरलें. असें अर्ध्या वाटेवर भेटायचें आणि परत जायचें म्हणजे निम्में मरण तरी चुकेल.

प०दा०:—हें ठरलें तर मग ? चल आतां परतायला कांहीं हरकत नाहीं.

[ दोघी परतात. कांहीं पावलें जाऊन पुन्हां येतात.

दोघी मिळून०:—एकमेकींचा एकमेकींना निरोप सांगितल्याशिवाय परतून काय कामाचें !

प० दा०:—निम्में मरण चुकलें या आनंदानें निरोप सांगण्याचें मला भानहि राहिलें नाहीं.

दु० दा०:—दुसरें अर्धे मरण चुकलें यामुळें माझीहि तशीच स्थिति झाली. तेव्हां तुझा निरोप काय आहे तो अगोदर सांग पाहूं ?

प० दा०:—मरण चुकण्याचा हा शकुन माझ्या निरोपला तर चांगला होतो आहे. पद्मावती ताईसाहेबांनीं मला राणीसाहेबांपाशीं अशी विनंति करायला सांगितलें आहे, दादाच्या पुढें मी आतां इतक्यांत येत नाहीं, आपणच प्रेमध्वजाबद्दल रदबदली करावी आणि दादाचा राग थोडा शांत झाल्यावर मी त्याच्या दर्शनाला जाईन.

दु० दा०:—राणीसाहेबांचाहि असाच निरोप आहे. राणीसाहेब म्हणाल्या, माझ्या चुकीमुळें हा प्रसंग ओढवला आहे. तर मी एकटीनेंच तिकडचे पाय धरून त्या सरदाराचे प्राण वांचविले पाहिजेत. तेव्हां इतक्यांत ताईसाहेबांनीं राणाजींच्या तंबूंत येऊं नये.

प० दा :—तुझा निरोप मी ताईसाहेबांना कळवितें.

दु० दा०:—तुझा निरोप मी राणीसाहेबांना कळवितें.

प० दा०:—चला, आतां परतूं या म्हणजे निम्मी पायपीट तरी वांचली.

दु० दा०:—असेंच निम्या वाटेवर एकमेकींना भेटून निम्म्या श्रमांत

दुष्पट कामें उरकायचीं अं या पुढें. [ दोघी परततात.

**दोघी मिळून०**:—पण धांदलींत एकमेकीला निरोप सांगायला विसरायचें नाहीं अं ! [ दोघी जातात.

---

## प्रवेश चवथा.

( प्रतापसिंहाचे पाय राणीनें धरले आहेत असा प्रवेश उघडतो. )

**प्रता०**:—सोड, पाय सोड, आणि तुला काय म्हणायचें असेल तें उभी राहून म्हण.

**राणी०**:—मला अभयवचन मिळाल्याशिवाय मी पाय सोडायची नाहीं.

**प्रता०**:—नाहीं, मी कोणालाच अभयवचन देणार नाहीं. उदेपूरच्या घराण्याची अशी बेअब्रू यापूर्वी कधींच झालेली नाहीं; हा कलंक धुऊन टाकण्याकरतां मला कृतांतकाळाचें स्वरूप धारण केलें पाहिजे. स्त्री, पुरुष, हा भेद मी या वेळीं मानणार नाहीं; म्हातारा, तरुण, किंवा एखादें तान्हें मूल, असला भेद मी या प्रसंगीं ओळखणार नाहीं; आई, बहीण, मुलगी, किंवा बायको, असलें नातें या समयीं मी जमेस धरणार नाहीं. असें उग्र रूप धारण केलें असतांना तुझ्या नवऱ्याच्या जिवाला अधिक कष्ट होऊं नयेत अशी जर तुझी इच्छा असेल तर अभयबिभय मागण्याच्या भानगडींत या वेळीं पडूं नकोस.

**राणी०**:—( उठून हात जोडून ) आपल्या जिवाला अधिक कष्ट देण्याची माझी इच्छा नाहीं. माझी इतकीच विनंति आहे, काल रात्रीं वन्संच्या तंबूंत जोधपूरचा सरदार गेला तो वन्संच्या विनंतीवरून नव्हे, तर माझ्या विनंतीवरून. या कामीं जर कोणाच्या हातून चूक झाली असेल तर ती माझ्या हातून झाली आहे.

**प्रता०:**—काय, त्यांच्या निलाजऱ्या प्रेमाला तूं मदत करीत होतीस ? आणि अशा रीतीनें मदत केल्याबद्दल मी त्याची, तुझी, व पद्मावतीची गय करूं होय ? आमच्या बायकांनींच आपली अब्रू जर एका बाजूस ठेविली तर आमच्या निशाणाची तरी अब्रू कशी साफ राहील ?

**राणी०:**—नाहीं, महाराज नाहीं; काल त्याला आमच्या तंबूंत बोलावण्यानें स्त्रीजातीला लाजेनें खाली मान घालावयास लागेल असा कोणचाच अपराध आमच्या हातून घडला नाहीं; उदेपूरच्या घराण्यांतील स्त्रियांच्या शीलाला कमीपणा येईल असें कोणचेंच अनुचित कृत्य आमच्या हातून घडलें नाहीं. बायकांना पुरुषांइतकी बुद्धि नसते, ही गोष्ट खरी आहे; पण शील कोणचें, कुशील कोणचें हें बायकांना पुरुषांहून अधिक समजतें.

**प्रता०:**—मला वाटतें, लग्नासंबंधानें बायकांना शील आणि कुशील कांहींच समजत नाहीं. कोणीकडून तरी कोणाचें कोणाशीं तरी लग्न झालें म्हणजे समाधान मानावें, ही बायकांची उपजत वृत्ति आहे. आणि याच लग्नावरील उपजत आसक्तीला बळी पडून पद्मावतीनें आणि तूं दोघींनीं मिळून आज उदेपूरच्या घराण्यावर हा असा प्रसंग आणला आहे ! प्रेमध्वजाला तर मीं देहांत शिक्षा सांगितलीच आहे. तुझ्या विनंतीनें त्या शिक्षेंत काडीभरहि फरक पडणार नाहीं. शिवाय पद्मावतीच्या अपराधाबद्दल ज्या पुरुषावर तिचें प्रेम नाहीं अशा पुरुषाशीं तिचें लग्न लावण्याचा मीं निश्चय केला आहे.

**राणी०:**—पण या कामीं त्या दोघांचीहि बिलकूल चुकी नाहीं. आपणांला जर शिक्षा करावयाचीच असेल तर ती शिक्षा मला एकटीला करावी. मी निमूटपणें ती शिक्षा सोशीन. इतकेंच नव्हे तर माझी शिक्षा चुकवण्याकरतां जर कोणी आपल्यापाशीं रदबदली केली तर ती आपण बिलकूल ऐकूं नये, असा हट्ट मी धरून बसेन.

प्रता०:—असल्या रदबदलीचा उपयोग आतां कांहीं व्हायचा नाहीं. माझ्या डोळ्यापुढें तें फाडलेलें मोडलेलें निशाण दिसतें आहे. त्या निशाणावरील जखमा म्हणजे उदेपूरच्या अब्रूवरील जखमा होत; माझ्या सर्व पूर्वजांच्या अंगावरील जखमा होत; उदेपूरच्या संग्रामदेवतेवरील जखमा होत. मीं सांगितलेली शिक्षा अंमलांत आल्याशिवाय त्या जखमा भरून यावयाच्या नाहींत.

राणी०:—(पाय धरून) मग मला बळी देऊन उदेपूरच्या निशाणाला, आपल्या पूर्वजांना, रजपुतांच्या संग्रामदेवतेला संतुष्ट करायचें होतें.

प्रता०:—नाहीं, नाहीं. मी शपथ घेऊन पुन्हां सांगतों, मी निशाणाची शपथ घेऊन सांगतों, मी पूर्वजांची शपथ घेऊन सांगतों, मी संग्रामदेवतेची शपथ घेऊन सांगतों–(पडद्यांत–'हं, शपथ वाहूं नका. शपथ वाहूं नका')
(एक नोकर प्रवेश करतो) [राणी उठते.

नोकर०:—सरकार, हकीम साहेब आपल्या भेटीकरतां आले आहेत.

प्रता०:—कोण, हकीमसाहेब? दे त्यांना आंत पाठवून. (नोकर जातो.) माझ्या निश्चयाला बहुतकरून विघ्न करण्याकरतांच ते आले असावेत.

हकी०:—(प्रवेश करून) प्रतापसिंहजी, आपणाजवळ मला कांहीं महत्त्वाच्या गोष्टीसंबंधानें बोलावयाचें आहे.

प्रता०:—थोडा वेळ आम्हांला दोघांनाच बोलूं द्या. (राणी जाते.) हकीमसाहेब, आपली काय मर्जी आहे?

हकी०:—मला आपल्याजवळ एकच विनंति करावयाची आहे. ज्या दिव्य औषधीच्या योगानें मीं आपणास बरें केलें व जिच्या योगानें मीं आजपर्यंत पुष्कळ रोगी बरे केले व पुढेंहि पुष्कळांना बरे करीन, त्या औषधीचा गुण राखण्याकरतां एकच जीव—

प्रता०:—वांचवा; असेंच कीं नाहीं तुमचें म्हणणें?

हकी०:—हो. महाराणा प्रतापसिंह यांच्या चरणांपाशीं हीच विनंति आहे, काल रात्रीं ज्या सरदाराला आपण देहांत शिक्षा दिली आहे त्याला कृपा करून वांचवा.

प्रता०:—हकीमजी, आज जे शेंकडों मुसलमान आमच्या छावणींत बंदिवान आहेत, त्यांना तुमची मर्जी असेल तर आतांच्या आतां सोडून देतों. तुमच्या जातिबांधवांना शत्रूच्या कैदेंतून मुक्त केलेत तर तुमची चोहोंकडे कीर्ति होईल. पण तें न करता आपण या रजपूत सरदाराबद्दल इतकी रदबदली करतां हें आश्चर्य आहे! त्याला वांचवून तुमचा कोणचा फायदा होणार आहे? हकीमजी, माझ्या न्यायाच्या आड तुम्ही विनाकारण कां येता? आम्हीं राजेलोकांनीं न्याय केला पाहिजे, व न्यायाबरहुकूम असेल ती कडक शिक्षा करण्यास दक्ष असलें पाहिजे.

हकी०:—न्यायाबरोबर दयासुद्धां राजांनीं दाखवावी व ती आपण दाखवलीच पाहिजे.

प्रता०:—कां दया दाखवावी?

हकी०:—न्याय अमकाच आहे, हें खात्रीनें ओळखण्याचें सामर्थ्य मानवांतील अत्यंत कुशाग्र बुद्धीलाहि परमेश्वरानें दिलेलें नाहीं म्हणून.

प्रता०:—हकीमजी, या गोष्टींत मी आपला एक शब्दसुद्धां ऐकणार नाहीं.

हकी०:—उदेपूरचा महाराणा आपले प्राण वांचवणाराचे अशाच तऱ्हेनें उपकार फेडतो काय? हिंदूंच्या, मुसलमानांच्या, प्रत्येक दरबारांत जाऊन तुमच्या या कृतघ्नतेच्या नीचपणाचा डंका वाजवीन. आणखी ज्या देशांत आज तुमचें नांवसुद्धां लोकांना ठाऊक नाहीं तेथल्याहि लोकांना तुम्हांला कृतघ्न म्हणून शिव्याशाप द्यायला लावीन. घ्या, त्या सरदाराचा प्राण घ्या, आणि कृतघ्नाकरितां परमेश्वरानें निर्माण केलेल्या नरकांत पडायला

तयार व्हा. हा चाललों मी. [ जाऊं लागतो.

**प्रता०:**—हकीमजी, प्रत्यक्ष उदेपूरच्या महाराण्याचा असा अपमान करणाऱ्याला या छावणींतून बाहेर जिवंत जातांच येत नाहीं, हें आपणाला माहीत नाहीं वाटतें! उदेपूरच्या निशाणाचा अपमान झाला असतांना कामांत हेळसांड केल्याबद्दल जर अपराध्याला मरणाची शिक्षा सांगण्यांत येत आहे, तर ती शिक्षा सांगणाऱ्या उदेपूरच्या महाराण्याचा हा असा तोंडावर अपमान करणाऱ्याला कोणचें भयंकर मरण—

**हकी०:**—(परतून) मरण? घाला, तलवारीचा धाव माझ्या मानेवर घाला, म्हणजे तुमची कृतीच तुमच्या कृतघ्नतेचें चित्र हुबेहूब काढील; माझ्या शब्दानें तें तितकें हुबेहूब भेसूर व भयंकर खास निघणार नाहीं. चालवा, आपली तलवार चालवा आणि फेडा आपल्या प्राणदात्याचे उपकार. [ गुडघे टेंकून बसतो.

**प्रता०:**—हकीमजी, तुम्हीं एकदां माझे प्राण वांचवले आहेत, पण आतांच्या या विनंतीनें ते प्राण पुन्हां घेण्याचेंच निष्ठुरतेचें काम तुम्ही आज करीत आहां. तुम्हींच दिलेले प्राण तुम्हांला घेण्याचा अखत्यार असल्यामुळें मी तुमच्या मागणीस रुकार देत आहें. जा, तुम्ही त्या जोधपूरच्या सरदाराला घेऊन जा. पण हें पक्कें लक्षांत ठेवा जर तो पुन्हां या प्रतापसिंहाच्या दृष्टीस पडला तर त्याची शेवटची घटका भरल्यावांचून राहणार नाहीं.

**हकी०:**—आपण सांगतां त्याप्रमाणेंच मी करीन.

**प्रता०:**—जा, त्याला घेऊन जा; आणि पुन्हां अशा रीतीनें मीं दिलेल्या शिक्षेंतून अपराध्यांची मुक्तता करायला येत जाऊं नका. [ पडदा पडतो.

——

## प्रवेश पांचवा.

( गरुडध्वजाची छावणी; गरुडध्वज, क्षय, व बुद्धिसिंग प्रवेश करतात. )

बुद्धि०:—गरुडध्वज, आपली ही नवी छावणी पूर्वीच्या छावणीहून फारच मनोहर आहे.—प्रतापसिंहाच्या छावणीपासून एक मजल दूर होईल नाहीं? फारच रम्य ठिकाण!

गरु०:—मग तुम्ह हि आपली छावणी आणा आमच्याजवळ. सुंदर स्थान आहे. इतकें सुंदर आहे कीं मला तर येथें एकसारखें दारू पीत रहावेंसें वाटतें, आणि तुमच्यासारख्या स्नेह्याशीं कारस्थानाच्या गोष्टी बोलण्यांत घालविलेला वेळ फुकट गेलासें वाटतें! आणा ना तुम्ही आपली छावणी या रम्य स्थानीं!

बुद्धि०:—मी येतोंच एक दोन दिवसांत; पण अशा रम्य स्थळीं पद्मावती बरोबर पाहिजे. तुम्हांला जसें दारूवांचून चैन पडत नाहीं त्याप्रमाणें मला पद्मावतीवांचून चैन पडत नाहीं.

गरु०:—मग तिला घेऊन या; माझी कोठें हरकत आहे?

बुद्धि०:—तुमची हरकत नाहीं, पण तिची हरकत आहे. माझ्या सांगण्याप्रमाणें प्रतापसिंहाशीं भांडून एक मजल आपली छावणी हालविलीत, आतां माझें बस्तान ठीक बसेल. येतोंच पहा एक दोन दिवसांत पद्मावतीला बरोबर घेऊन.—आतां आपण परता आपल्या तंबूकडे; येतों मी.—काय रे क्षया, मग काय तूं मजबरोबर येत नाहींस? याच छावणींत राहणार?

क्षय०:—होय महाराज, हे पाय मला अन्नदाते आहेत; इतकेंच नव्हे तर मोक्षदाते आहेत.

बुद्धि०:—बरें, रहा तूं येथेंच. गरुडध्वज, मी येतों; आतां ठरल्याप्रमाणें करायचें एकूण? तुम्हांला कोणी कांहीं विचारलें तर मजकडे बोट दाखवा.

आपला कार्यभाग जसा साधेल तसा मी साधून घेतों. प्रतापसिंहाच्या मार्फत साधला तर प्रतापसिंहाच्या मार्फत, अमरनाथ साधूंचीं आर्जवें करावीं लागलीं तर अमरनाथ साधूच्या मार्फत, अकबरशहाशीं संधान बांधावें लागलें तर अकबरशहाच्या मार्फत. असें नाहीं तसें, तसें नाहीं असें, जसजसें जुळेल तसतसें करूं. आपणाला काय, त्रिवेणीसंगमाचें स्थान मोकळें करायचें; मग लोकांनीं एकतोंड्या, दुतोंड्या, तीनतोंड्या, म्हटलें म्हणून काय वेंचतें!

गरु०:—तें तुमचें तुम्ही पाहून घ्या. अकबरशहा म्हणेल त्या अटी कबूल करा. माझें म्हणणें इतकेंच, प्रयाग तीर्थावर यापुढें माझा अम्मल चालला पाहिजे.

बुद्धि०: हें तर कलम ठरलेंच. मला पद्मावती, तुम्हांला प्रयाग तीर्थ, आणि अकबरशहाला बिनबोभाट दिल्लीच्या तक्ताचा उपभोग. पण ध्यानांत धरा, माझ्या तंत्रानें तुम्हीं वागलें पाहिजे. मी येतों, जसें जमेल तशा कारस्थानाचीं सूत्रें मी आतां सांगितल्याप्रमाणें हलवीत राहणार. [ जातो.

गरु०:—क्षया, झाला कीं नाहीं हा गरुड प्रयागाचा अधिपति! आज आणि कालची छावणी सोडून, प्रतापसिंहाशीं उघड भांडून, चार कोस अलीकडे येथें येऊन राहिलों आहों. आतां आमचा आणि प्रतापसिंहाचा काय संबंध उरला? सर्व रजपूत राजांचा मीच नाहीं का आतां मुख्य झालों?

क्षय०:—आपण येथें सर्वांचे मुख्य झालां हें माझ्या ध्यानांत केव्हांच येऊन चुकलें. त्या तेथें प्रतापसिंहाच्या छावणीजवळ दारू देखील लपूनछपून घ्यावी लागे! आणि तोंडाला वास येईल म्हणून अत्तर अंगाला फासून फिरावें लागे! तेथें मद्यपान निषेधाचें मोठें बंड! बंड कसलें म्हणा, तेथल्या मद्यपान निषेधानें दारूचा खप कमी न होतां दारूबरोबर अत्तराचा खप वाढला इतकेंच काय तें. येथें कसे आम्ही स्वतंत्र आहों! कोणा पाहिजे त्याच्या देखत,

कोणा पाहिजे त्याच्या छातीवर पाय देऊन तोंडाला दारूचा पेला लावायला येथें बिलकूल हरकत नाहीं.

गरु०:—असाच आहे माझा अम्मल! मला देखील त्या प्रतापसिंहाचा मोठा सासुरवास झाला होता. आणि त्या सासुरवासांतून उघडपणें सुटण्याकरतां मुद्दाम म्हणून दारू पिऊन त्या निशाणाकडे त्या दिवशीं गेलों होतों.

क्षय०:—महाराजांचें तें करणें मला फार पसंत पडलें. पण सरकार, उद्यां प्रयाग आपल्या ताब्यांत आल्यावर गंगा-यमुना बरोबर मदिरेचा संगम करायला तेथें मजसारख्यांना आतांच्या सारखी मोकळीक राहील ना?

गरु०:—हें काय विचारतोस? तसें न झालें तर धर्मयुद्धाचा मीं केलेला एवढा अट्टाहास फुकट गेल्यासारखा नाहीं का होणार?

क्षय:०—जन्मास आल्याचें सार्थक झालें असें मला वाटत आहे. कारण गंगायमुनांच्या संगमावर बसून, अमरनाथ साधूच्या देखत, त्याच्या नाकावर टिचून, हा मी दारू पीत आहें असें त्याला बजावून, मदिरापाशन करण्याचा पर्वकाल मला लवकरच प्राप्त होणार आहे.

गरु०:—प्राप्त होणार कसला? झाला आहे म्हण. चल, माझ्या तंबूंत चल. तेथें मी गरुड गारुड्याप्रमाणें मदिरेच्या एका शिशींतून तुला गंगा काढून दाखवितों, यमुना काढून दाखवितों, अमरनाथ साधूलाहि बाहेर काढून तुझ्यापुढें प्रत्यक्ष उभा करतों. मग काय हा सूर्य आणि तो जयद्रथ, टाक पिऊन एकटा शिशीच्या शिशी! चल, एका शिशींतली गंगा, दुसऱ्या कुपींतली यमुना, तिसरींतली सरस्वती, मदिरेच्या सर्व नद्या या सागराला अखेरला येऊन मिळत असतात. आणि क्षया, तुला असें दाखवतों, सगळ्या नद्या जरी येथें येऊन मिळाल्या तरी एक बोटभरहि पोट न फुगतां सर्वांना गडप करून टाकण्याचें सामर्थ्य या माझ्या समुद्राच्या अंगीं आहे. [ जातात.

———

## प्रवेश सातवा.

---

( प्रतापसिंहाचा तंबू ; प्रतापसिंह व बुद्धिसिंग येतात. )

प्रता०:—थोडा वेळ थांबा, इतक्यांत पद्मावती येथें येईल. तुमच्या-देखतच सर्व गोष्टी मी तिला समजावून सांगतों.

बुद्धि०:—पण महाराज, या लग्नाच्या भानगडींत मीं आतां पडावें असें मला कांहीं वाटत नाहीं. मी पद्मावतीला कमी योग्यतेची किंवा कमी दर्जाची समजतों अशांतला भाग नाहीं. पण लोकापवाद आहे ना ? सर्व रजपूत छावणींत लहानापासून थोरापर्यंत प्रत्येकजण याच गोष्टीची चर्चा करीत असतो; प्रेमध्वजाला रात्रीं तंबूंत बोलण्याइतक्या वाईट थराला या दोघांचें प्रेम महाराण्यानें जाऊं कसें दिलें !

प्रता०:—तिनें बोलावलें नाहीं, हें मीं आतां तुम्हांला सांगितलें ना ?

बुद्धि०:—आणि आपण सांगण्यापूर्वीच मला खरी खरी हकीकत समजली होती. पद्मावतीबद्दल माझ्या मनांत कोणचीहि शंका नाहीं. पण लोकापवाद आहे ना ? तीर्थोदक, अग्नि, व देवता हींहि भ्रष्ट होऊं शकतात, आणि त्यांना प्रसंगीं शुद्ध करून घ्यावें लागतें, असें मानणारी दुनिया आहे. तेव्हां पद्मावतीवर जरी माझें प्रेम असलें तरी मज-सारख्याला पचणारें तें रत्न नव्हे, असें समजून मीं गप्प बसावें, हेंच उचित होय.

प्रता०:—दुःखांतून दुःख बाहेर पडतें, एक कष्ट दुसऱ्या कष्टाला प्रसवतें, त्याप्रमाणें एका अपमानापासून दुसऱ्या दुष्कीर्तीला प्रारंभ होऊं पहात आहे. प्रेमध्वजाचा व पद्मावतीचा वाईट संबंध होता या लोकापवादामुळें बुद्धिसिंगजींनींहि तिचें पाणिग्रहण करण्याचें नाकारलें, असा बभ्रा चोहोंकडे झाला—

बुद्धि०:—तर पद्मावतीला योग्य पति कोणीहि मिळणार नाहीं, आणि सर्व जन्म तिला जोगिणीप्रमाणें काढावा लागेल. प्रतापसिंहजी, पद्मावतीच्या या दीन स्थितीचें चित्र मनापुढें उभें राहिलें म्हणजे एकदां असें वाटतें लोकापवादाशीं टक्कर देण्याचें काम या बुद्धिसिंगानें आपल्या शिरावर कां घेऊं नये ? पण—

प्रता०:—पणबीण कांहीं नको ! बुद्धिसिंगजी, तुम्हीं जर पद्मावतीशीं लग्न केलेंत तरच हा लोकापवाद आमच्या घराण्याच्या कपाळचा टळणार आहे. ही पाहा पद्मावती आली. तुमच्यादेखत तिला सर्व गोष्टी मी समजावून सांगतों, म्हणजे हा संबंध जुळवून आणायला मी किती उत्सुक आहें, हें तुमच्या ध्यानांत येईल.

बुद्धि०:—कोणत्याहि गोष्टीची घाई करूं नये. त्यांना सर्व समजावून सांगा. माझी कोणचीहि हरकत नाहीं. पण आतांच्या आतां—तडकाफडकीं—त्यांनीं होय म्हटलेंच पाहिजे असा हट्ट नसावा. अब्रूच्या व लग्नासंबंधाच्या बाबी धिमेपणानें घडवून आणाव्या लागतात. [ पद्मावती येते.

पद्मा०:—दादा, मला कशाला बोलावलें होतें ?

प्रता०:—पद्मावती, माझ्या निशाणाची तशी ती बेअब्रू झाल्यामुळें गेल्या आठ दहा दिवसांत कोणचा चमत्कारिक प्रसंग आमच्या घराण्याच्या अब्रूवर गुजरला आहे, हें तुला माहीत आहे का ?

पद्मा०:—आपल्या आवडत्या बहिणीच्या जन्माच्या सुखावर महाराणाजीनें संतापाच्या भरांत स्वतःच्या हातांनीं कायमचे निखारे ठेवले, याहून दुसरा कोणचा चमत्कारिक प्रसंग, दादा, यावेळीं आमच्या घराण्यावर गुजरला आहे ? ते मोंगलांच्या छावणींतच राहिले आहेत का दुसरीकडे कोठें गेले ? त्यांच्याकडून कांहीं निरोप आला आहे काय ? ही पद्मावती चंचल स्वभावाची आहे, असेंच अजून त्यांना वाटत आहे काय ?—

प्रेमध्वज! तुमच्या मनांतील ती कल्पना घालविण्याची संधि मला कधीं तरी मिळेल काय?

प्रता०:—पद्मावती, हुषार चतुर म्हणून नांवाजलेल्या माझ्या वहिणीनें अशा वेळीं मजपुढें असें वरळत राहावें, हें तुला शोभतें का? सांप्रत प्रसंग कोणचा आला आहे, हें प्रथम ऐकून घे. गरुडध्वज व त्याच्या कक्षेंतले इतर रजपूत राजे ही छावणी सोडून, माझ्याशीं भांडून, चार कोस पलीकडे जाऊन राहिले आहेत. आणि तशीच वेळ आली तर उदेपूराशीं उघड उघड लढाई करण्याचा त्यांचा संकल्प आहे. माझे दोस्त हे बुद्धिसिंगजी आणि त्यांच्या कक्षेंतले कांहीं राजे अद्याप आमच्या छावणीशेजारीं आहेत; पण ते आज विचारीत आहेत—

बुद्धि०:—आम्हीहि शेजार सोडून जाऊं किंवा कसें?—धर्मयुद्धाला प्रारंभ झाला त्या वेळीं खुद्द राणाजींनीं आणि राणीसाहेबांनीं माझ्या घराण्याचा व उदेपूरच्या घराण्याचा संबंध घडून येईल तर बरें, असे उद्गार काढले; पण आज जो तो मजकडे बोट दाखवून कुजबुजूं लागला आहे, बुद्धिसिंगजींनीं बाशिंगाच्या तेवढ्या विचारांत गुंगत राहावें आणि पद्मावतीच्या तंबूंत रात्रींअपरात्रीं भलताच पुरुष दृष्टीस पडावा, असे हे बुद्धिहीन कसे?—रागावूं नका. शांतपणानें या गोष्टीचा विचार केला पाहिजे. माझा कोणावर जुलूम नाहीं; इतकेंच नव्हे तर केवळ परिस्थितीच्या प्रवाहानें दबून जाऊन शांत विचारानेंहि केलेल्या रामरामांत सुख नसतें, हें मला माहीत आहे. पण दोस्ताच्या घराण्याच्या अब्रूकरतां कांहीं कांहीं अप्रिय गोष्टी कष्टानें कराव्या लागतात; त्यांतलीच आतांची वेळ आहे असें मीं समजतों.

प्रता०:—पद्मावती, अशी तोंड फिरवून उभी राहूं नकोस. प्रसंग नीट समजावून घे. बुद्धिसिंग जर गरुडध्वजाला जाऊन मिळाले तर

अकबरशहाशीं लढण्याला मी एकटाच शिल्लक राहतों. मी एकटाहि लढण्याला तयार आहें आणि सर्व मोंगलांच्या सैन्याला पुरून उरेसाहि आहें, पण—

**बुद्धि०:**—पण खुद्द उदेपूरच्या सैनिकांच्या अंगांत तरी या धर्मयुद्धाबद्दल उत्साह पाहिजे ना? महाराणाजीनें आपल्या एका नादान बहिणीच्या नादीं लागून रजपूत राजांमध्यें फाटाफूट केली असें जर उदेपूरच्या छावणींत चोहोंकडे जाहीर झालें, तर कितीशा लोकांच्या तलवारी पूर्वीच्याच झटक्यानें म्यानांतून बाहेर पडतील?

**प्रता०:**—पद्मावती, प्रसंग तुझ्यामुळें ओढवला आहे तो हा असा आहे. अकबरशहाशीं इतर सर्व राजांनीं तहाचें बोलणें लावलेंच आहे. लढण्याची रग माझ्या एकट्याच्या मनगटांत उरलेली आहे, आणि मोंगलांचा पुरा मोड होईपर्यंत ती तशीच कायमहि राहील. पण पद्मावती, मी लढण्यांत गुंतलों असतांना माझ्या घराण्यांतल्या बायका नादान असतात अशी चर्चा—

**बुद्धि०:**—निशाणाची बेअब्रू म्हणजे आपल्या राजसत्तेची बेअब्रू; आणि आपल्या स्त्रियांच्या शीलासंबंधाची चर्चा म्हणजे कुलाची बेअब्रू. या दोन बेअब्रूंच्या कात्रींत सांपडल्यावर—

**प्रता०:**—झुंझण्याची माझ्या मनगटांतील रग कशी कातरली जाणार नाहीं? माझ्या निशाणाची अब्रू संभाळण्याचें काम मीं त्या प्रेमध्वजावर सोंपवलें होतें; माझ्या घराण्यांतील स्त्रियांच्या पदरीं नादानपणा न येऊं देण्याचें काम मी आज, पद्मावती, तुझ्यावर सोंपवितों.

**बुद्धि०:**—आणि राणाजी, मला खात्री वाटत आहे, यांच्या हातून प्रेमध्वजासारखी चूक न होतां नादानपणाचा लागूं पाहात असलेला कलंक—

**पद्मा०:**—नादान! नादान! बुद्धिसिंगजी, कोणाला मघांपासून नादान म्हणतां? दादाच्या पुढें मी मुकाट्यानें उभी आहें म्हणून पाहिजे तसें तोंडसुख घेतां काय?—दादा, या नीचानें आजपर्यंत माझा कसा छळ केला आहे हें

सर्व जर तुला माहीत असतें तर आपला दोस्त—आपला मित्र—असें तूं याला कधींच म्हटलें नसतेंस.

बुद्धि०:—प्रतापसिंहजी, मी आतां आपली रजा घेतों. मी येथें राहिल्यानें यांचा संताप अधिकच वाढत जाण्याचा संभव आहे. मी गेल्यावर आपण शांतपणें सर्व गोष्टींचा विचार करा. तीनचार दिवसांनंतरहि हा संताप असाच कायम राहिला तर, त्याच्या तापाची बाधा माझ्या शांत डोक्याला होऊं नये म्हणून मला माझी छावणी येथून हलवावी लागेल. [ जाऊं लागतो.

प्रता०:—थांबा हो, जरा थांबा. तुम्ही असे रागावून जाऊं नका.

पद्मा०:—जाऊं दे, दादा, त्याला खुशाल जाऊं दे. आतां येथून जाऊं दे इतकेंच नव्हे तर आमचा शेजार सोडूनहि त्याच्या सैन्याचा तळ खुशाल दूर जाऊं दे. दादा, उदेपूरच्या घराण्यांतल्या बायकांना नादान म्हणणाऱ्या जिभेला तूं पूर्वी जेथल्या तेथें छाटून टाकलें असतेंस,—

प्रता०:—पद्मावती,—

पद्मा०:—देवानें आज हे असे दिवस दाखविले!

प्रता०:—पद्मावती, धर्मकार्य व राजकार्य हीं दोन्ही लक्षांत घे आणि असें बरळणें सोडून दे.

पद्मा०:—दादा, तुला इतकेंहि समजूं नये, जो नीच मला नादान म्हणतो त्याच्याशीं कोणची उदेपूरच्या घराण्यांतील राजकन्या लग्न करायला तयार होईल? निशाणाच्या झालेल्या बेअब्रूमुळें दादा असा गांगरून गेलेला; प्रेमध्वजांनाहि छावणी सोडून मोंगलांच्या छावणींत जाणें भाग पडलेलें, अशी संधि पाहून, नीचा, तुझ्या जिभेनें आज मला नादान म्हटलें हं!—दादा, उदेपूरच्या अब्रूला साजणार नाहीं असें कोणचेंहि कृत्य आजपर्यंत या पद्मावतीच्या देहानें, वाणीनें, किंवा मनानें केलेलें नाहीं. हें माझें पुण्य अंगांत संचरून, या वेळीं दादा, सांगत आहे, ज्या हलकट जिभेनें मला आतां

नादान म्हटलें त्या जिभेच्या नीच हातांनींच त्या रात्रीं उदेपूरच्या निशाणाचे तुकडे तुकडे केले असले पाहिजेत.–दादा, माझ्या व तुझ्या दोघांच्याहि या शत्रूला तूं इतकें कां गोंजारतोस ?–जा, बुद्धिसिंगजी, जा. तीन दिवसांनीं कशाला, आतांच्या आतां छावणी सोडून खुशाल चालते व्हा. तीन दिवसांनीं सांगावयाचें उत्तर मी आतांच देतें. प्रेमध्वजाचें मुखकमल यापुढें कधींहि माझ्या दृष्टीस पडावयाचें नसलें तरी त्यांच्या चरणाची दासी म्हणवून घेऊन जन्म काढण्याचा माझा निश्चय आहे.

प्रता०:—बुद्धिसिंगजी, हें संतापाच्या भरांतलें भाषण आहे.—पद्मावती, हें काय बरळतेस ? धर्मकार्य व राजकार्य यांचा विचार कर.

पद्मा०:—दादा, विचार कसला करायचा ? माझें उत्तर वज्रलेप आहे. पतिप्रेमाच्या आड येणाऱ्या धर्मकार्याला व राजकाजाला बायका तुच्छ मानीत असतात.

बुद्धि०:—जाऊं द्या मला. मींच निशाणाचे तुकडे केले अशी जेथें समजूत, तेथें राणाजी, तुमच्या उपदेशाचा तरी काय उपयोग होणार ?

पद्मा०:—होय, तुझ्याच हातानें उदेपूरच्या निशाणाचा तसा अपमान केलेला असला पाहिजे. माझी मनोदेवता मला सांगत आहे, तूंच तें दुष्ट कृत्य केलेंस. तूं या वेळीं आपलें पाप कबूल करणार नाहींस, पण तुझ्या हृदयांत शिरूं लागणारी प्रेमध्वजाची तलवार तुझ्या जिभेला तुझ्या त्या पापाचा उच्चार करण्यास खात्रीनें भाग पाडील. [ पडदा पडतो.

## अंक चवथा समाप्त.

---

# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.

( प्रेमध्वज व हकीम प्रवेश करितात. )

**हकी०:**—प्रेमध्वज, हा काळा पडदा तुम्ही आपल्या चेहऱ्यावर नीट बसविलात म्हणजे राणाजींच्या या छावणींत तुम्हांला कोणी ओळखावयाचें नाहीं. तुमचा शत्रु मी तुम्हांला दाखवून देतों, त्याच्याशीं द्वंद्व युद्ध करा, किंवा इतर रीतीनें त्याची अप्रतिष्ठा करा; मला त्या गोष्टीशीं कांहीं कर्तव्य नाहीं. एवढें मात्र लक्षांत ठेवा कीं तुम्ही येथें उघडकीस आल्यावर प्रतापसिंह तुम्हांला जिवंत ठेवणार नाहीं, आणि त्या वेळीं तुम्हांला पुन्हां वांचविण्याचें सामर्थ्य या हकीमाचे शब्दांत राहणार नाहीं.

**प्रेम०:**—हकीम साहेब, जिवंत राहण्यांत मला सुखच उरलेलें नाहीं, म्हणून तर मी तुमच्याबरोबर रजपुतांच्या छावणींत आलों ना ! तुम्ही ज्या वेळीं मला मरणाच्या शिक्षेंतून सोडविलेंत आणि आपल्याबरोबर घेऊन गेलांत, त्या वेळीं मोंगलांच्या छावणींत पाऊल ठेवतांना मला बरें वाटलें, असें का तुम्हांला वाटतें ? रणांगणावर विजयश्रीनें नटून शत्रूंची छावणी उध्वस्त करण्याकरितां जे पाय मोंगलांच्या छावणीला लावावयाचे, तेच पाय आश्रयाकरितां मोंगलांच्या छावणींत शिरत असलेले पाहून, अन्तरिक्षांत गुप्तपणें संचार करणाऱ्या पूर्वीच्या सर्व रजपूत साध्वी माझ्या तोंडावर थुंकल्या असतील ! हकीमसाहेब, मी आज पुन्हां रजपुतांच्या छावणींत, माझ्या शत्रूला बगलेंत मारून त्याच्या सकट मृत्यूला कवटाळण्याकरितां पाय ठेवीत आहें; पण मला या मरणाची भीति न वाटतां लग्नसोहळ्याच्या वेळचा आनंद होत आहे.

माझा शत्रु मला दाखवून द्या, मग तो आहे, मी आहें, आणि मृत्यु आहे.

**हकी०:**—तुमचा शत्रु तुम्हांला दाखवून देण्याकरितां तर मीं तुम्हांला येथें आणलें आहे. हें पहा, पद्मावतीचें प्रेम जर तुमच्यावर अद्याप कायम असलें तर राणाजींच्या समोर भर दरबारांत तुमचा शत्रु मी तुम्हांला दाखवून देईन; आणि जर पद्मावतीचें प्रेमच डळमळलें असलें—

**प्रेम०:**—तर निशाण मोडणारावर सूड उगविल्यानंतर जिवंत राहून तरी मला काय करावयाचें आहे ?

**हकी०:**—म्हणून म्हणतों, हा काळा पडदा चेहऱ्यावर बसवा आणि अकबर बादशहाचें हें प्रेमाचें पत्र पद्मावतीला नेऊन द्या. मग पद्मावतीचें प्रेम आपोआप कसोटीला लागेल; व बुद्धिसिंगाच्या छावणींत पसरलेली अफवा कितपत खरी आहे, तें तुमचें तुम्हांला समजेल.

**प्रेम०:**—तसें नको हकीम साहेब; मला प्रथम सूड उगवूं द्या. कारण बुद्धिसिंगजीच्या छावणींत पसरलेली अफवा जर खरी ठरली, आणि बादशहाशीं लग्न करण्याचें नाइलाज होऊन जर पद्मावतीनें ठरविलें असलें, तर द्वंद्व युद्धाकरितां स्फुरण पावणारे हे माझे बाहु एका क्षणांत लटके पडतील, माझी कंबर जागच्या जागीं खचेल, आणि पद्मावतीहि ज्या दुरात्म्याला टाळूं पाहते त्यानें सूड उगविण्यांत तरी कोणचा पुरुषार्थ आहे असें मला वाटूं लागेल. प्रेमविषयाच्या तोंडचा एखादाहि प्रोत्साहनाचा शब्द पुरुषांना पाहिजे तें साहस करण्यास प्रवृत्त करितो, आणि टाळाटाळीची एखादीहि नजर प्रत्येक नसेंतील जीव खेंचून घेऊन तेव्हांच निरुत्साह करण्यास समर्थ असते. म्हणून म्हणतों प्रथम मला सूड उगवूं द्या, आणि नंतर—

**हकी०:**—नाहीं, तसें नाहीं. प्रथम तुम्हीं हें पत्र घेऊन पद्मावतीकडे गेलें पाहिजे—

**प्रेम०:**—विषाची पारख करावयास मला प्रथम कां सांगतां ?

हकी०:—बाबा, प्रेमानें विष अमृत होऊं शकतें. पद्मावतीवरील तुमचें जर प्रेम खरें असेल तर बुद्धिसिंगाच्या छावणींतील अफवा खोटी ठरल्यावांचून राहणार नाहीं. हा काळा पडदा घ्या आणि शिद्दी बनून हें पत्र पद्मावतीकडे प्रथम घेऊन चला. हें पहा, पद्मावतीनेंहि तुम्हांला ओळखूं नये म्हणून तुम्ही मुक्याचें सोंग घ्या. (पडदा देतो) जा, शिद्याचें सोंग घेऊन या; म्हणजे पुढें बतावणी कशी करावयाची तें मी तुम्हांला सविस्तर सांगेन.

प्रेम०:—कृतघ्नपणाचा दोष लागूं नये, म्हणून मला आपल्या म्हणण्याप्रमाणें वागणें भाग आहे. [ जातो.

हकी०:—प्रेमध्वजा, तूं माझे प्राण एकदां वांचविले आहेस, इतकेंच नव्हे तर प्राणाहूनहि प्रिय असलेल्या, आणि बुद्धिसिंगाच्या कचाटयांत सांपडलेल्या माझ्या अब्रूचें रक्षण त्या दिवशीं तूं केलें आहेस. माझी अप्रतिष्ठा तूं होऊं दिली नाहींस; तुझी बेअब्रू मीं उद्यां साफ धुवून टाकल्याशिवाय तुझ्या ऋणाचें माझ्या मस्तकावरील ओझें हलकें कसें होईल ? [ जातो.

---

## प्रवेश दुसरा.

स्थळ—पद्मावतीचा तंबू.

पद्मा०:—माझ्या दादाला बरें करणारा तो हकीम अकबरशहाकडून तहाचें बोलणें लावण्याकरितां आमच्या छावणींत आला आहे, आणि बातमी आली आहे कीं, शहा म्हणे त्यांच्यावर मानमरातबाचा वर्षाव करीत आहे. त्यामुळें त्यांचें मन चंचल तर झालें नसेल ना ? यवनांच्या वैभवाला ते भुलून तर गेले नसतील ना ? आणि म्हणे शहाच्या जनानखान्यांत असल्या तरुण वीरांना मोह पाडणाऱ्या फार सुंदर राजकन्या रजपूत कुमारिकांच्या सवती होण्यास सज्ज होऊन बसलेल्या असतात ! छे, असें व्हायचें नाहीं. दादामुळें कदाचित्

ते या धर्मयुद्धाचा नाद सोडतील, पण माझ्या वरचें त्यांचें प्रेम नेहमीं जसेंच्या तसेंच कायम राहील. मग त्यांनीं धर्मयुद्धाचा नाद तरं कां सोडावा ? नाहीं, ते माझाहि नाहीं आणि धर्मयुद्धाचाहि नाहीं—कोणचाच नाद सोडणार नाहींत. असें आहे तर मग त्यांच्याकडून या हकीमाबरोबर चिठ्ठी, पत्र, किंवा निरोप, कांहीं तरी यायला नको होता का ? [ दासी प्रवेश करिते.

**दासी०:**—बाईसाहेब, हकीम साहेबांनीं गम्मत म्हणून बरोबर आणलेला तो मुका शिद्दी आपल्या दर्शनाची वाट पाहात आहे.

**पद्मा०:**—त्याचें काय काम आहे, कशाला आला आहे, नीट विचारशील कीं नाहीं ?

**दासी०:**—हें काय बाईसाहेब, तो मुका आहे ना ? त्याला मी विचारूं कशी ? ओठांची नुसती हालचाल मुक्याला माहीत असते; आवाज जर ऐकूं येऊं लागला तर तो मुका कसला ?

**पद्मा०:**—बरें, बरें, जा त्याला आंत पाठवून दे. ( दासी जाते ) हा त्यांच्याच कडून कांहीं निरोप घेऊन आला नसेल कशावरून ? किंवा नसेलहि. गम्मत म्हणून हकीमांनीं त्याला मजकडे पाठविला असेल. गम्मत असेल खरी, पण मन सांगतें कीं या गमतींत माझें फार हित असलें पाहिजे. हो, हेंच खरें.

( शिद्याचे वेषांत प्रेमध्वज येतो. )

**पद्मा०:**—( स्वगत ) ही चालण्याची ढब माझ्या ओळखीची दिसते. त्यांचा निरोप घेऊन हा आला असावा. याला खरोखर बोलतां येत नसावें; तेव्हां मग बोलण्यांत नाहीं तर चालण्यांत तरी निदान त्यांच्या अनुकरणाची छटा यानें दाखवावी हें रास्तच आहे. ( उघड ) तुमचा दर्जा कितीहि कमी असो, तुमच्या या काळ्याकुट्ट चेहऱ्याला लोक कितीहि तुच्छ मानीत असोत, गुलामाच्या स्थितींत गेल्यामुळें श्रीमंत लोक

तुम्हांला कितीहि हलक्या दर्जाचें खेळणें समजत असोत, तुमचें चालणें माझ्या प्रियकरासारखें आहे; आणि गुरूच्या पादुका भक्तजनांपुढें ज्याप्रमाणें गुरुची साक्षात् मूर्ति उभी करण्यास समर्थ असतात, त्याप्रमाणें तुमची ही गति प्रियकराचें दर्शन मला या वेळीं घडवीत आहे. म्हणून म्हणतें, सेवकाचें नातें सोडून द्या, या ठिकाणीं थोडा वेळ—हें काय मी बरळत आहें ? याला बोलतांहि येत नाहीं व ऐकूंहि येत नाहीं ! याच्याशीं खुणांनींच बोललें पाहिजे. (त्याला खुणवते ) काय ? याला खुणाहि समजत नाहींत ! तुम्हांला डोळेहि नाहींत काय ? तुमचे डोळे असे पाण्यानें भरून कां आले ? (त्याजकडे पाहात स्वगत ) यांचें चालणें त्यांच्याचसारखें आणि बघणेंहि त्यांच्याचसारखें ! यांच्या शरीराला हा असा कंप कां बरें सुटला ? हे बावरल्यासारखे कां बरें झाले ? या माझ्या बोलण्याचा यांच्यावर परिणाम खास झाला असला पाहिजे. मुक्याचें हें सोंग असावेंसें दिसतें. ( उघड ) प्रेमध्वजाच्या प्रियकर पत्नीला आपण कोणता निरोप घेऊन आलां आहां ? मी देवीच्या देवळांत त्यांच्या हातावर टाकलेल्या हारांतील फुलें प्रेमाची खूण म्हणून त्यांनीं जतन करून ठेविलीं आहेत; प्रेमाची आठवण मला करण्याकरतां त्यांनीं जर तीं तुमच्या बरोबर पाठविलीं असतील तर त्यांना सांगा, प्रेमाची आठवण पुरुषांना करावी लागते, बायकांना करावी लागत नाहीं. ( त्याजकडे पाहात स्वगत ) होतो, माझ्या शब्दांचा त्यांच्यावर परिणाम होतो. यांचें चालणें पहाण्याबरोबर मला आलेला संशय खरा होणार काय ?—डोळ्यांची तर खूण पटली. आतां असें करावें म्हणजे खऱ्या खोट्याचा तेव्हांच शहानिशा होईल. ( उघड ) हें पहा, तुम्ही त्यांचा निरोप घेऊन आलां आहां यांत संशय नाहीं. तुमच्या जवळ जरी चिठ्ठी पत्र नसलें, तरी तुमच्या डोळ्यांत भरलेला प्रेमाचा तो निरोप मला सहज वाचतां येतो. त्यांना उलट माझा निरोप कळवा, ही प्रेमाची आठवण मला या वेळीं अत्यंत दुःखदायक झाली

आहे. कारण रजपूत राजांतील आपआपसांतील द्वेषामुळें माझा दादा निरुत्साह झाला असून ही रजपुतांतली फाटाफूट नाहींशी व्हावी म्हणून शहाला मला देण्याचा त्यानें निश्चय केला आहे.

**प्रेम०:**—काय ? महाराणा प्रतापसिंहानें असला निश्चय केला आहे ?

**पद्मा०:**—मुक्याला जसें बोलतां आलें त्याप्रमाणें शिद्याचा रंग बदलल्या-शिवाय मी पुढील हकीकत सांगणारच नाहीं.

**प्रेम०:**—( स्वगत ) अरे, हिनें मला फसवलें ! प्रेमाच्या कामांत पुरुषां-पेक्षां बायका धूर्त असतात, हें कांहीं खोटें नाहीं. ( उघड ) शहाबरोबर तुझें लग्न लागल्यानंतर तोंड काळें करण्यापेक्षां अगोदरच तोंड काळें झालेलें चांगलें नाहीं का ? पद्मावतीच्या–तुझ्या–त्या दुर्दैवी प्रेमध्वजाचा निरोप घेऊन मी आलों नाहीं, तर शहाचा नोकर या नात्यानें शहाचा निरोप घेऊन मी आलों आहें. या निरोपाला तुझ्या तोंडून जें उत्तर येईल त्यावर माझें तोंड पुनः स्वच्छ होणें अवलंबून आहे. हें शहाचें प्रेमाचें पत्र आहे. नीट वाच, मनन कर, आणि काय उत्तर द्यायचें असेल तें दे. ( पत्र देतो ) मला आशा होती, महाराणा प्रतापसिंह या लग्नाला संमति देणार नाहींत. पण तीहि फुकट गेली. पद्मावती, आतां या दुर्दैवी प्रेमध्वजाची आठवण विसर. आणि माझा तो स्वच्छ चेहरा मनांत न आणतां माझ्या तोंडाला लागलेल्या या काळिम्यावर एक सारखी दृष्टि ठेवून–किंबहुना ही काळोखी मला जन्माची कायम लागली आहे असें पक्कें समजून—काय तें उत्तर दे.

**पद्मा०:**—शहानें पाठविलेल्या या प्रेमाच्या पत्राला माझें हें एकच उत्तर आहे. ( पत्र फाडते ) हें घ्या.

**प्रेम०:**—( तोंडावरचा पडदा काढून ) पद्मावती, तुझ्या प्रेमाच्या अंगीं माझा काळिमा धुवून टाकण्याचें सामर्थ्य होतें आणि त्यानें तो या

क्षणीं धुवून टाकला आहे. पद्मावती, मला आतां एकच गोष्ट खरी खरी सांग, प्रतापसिंहानें तुला शहाला देण्याचा खरोखरच निश्चय केला आहे काय ?

**पद्मा०:**—नाहीं, महाराज, नाहीं. खोटा बहाणा करून मीं विनाकारण आपलें मन दुखवलें याबद्दल—

**प्रेम०:**—मी शिद्याचें खोटें सोंग आणलें याबद्दल मला केलीस ती शिक्षा बरोबरच झाली. पद्मावती, आतां यापुढें तुझ्या व माझ्यामध्यें कृत्रिम कांहींहि शिल्लक रहाणार नाहीं. (पद्मावती हात पुढें करते; तो न धरतां) नाहीं, मी अजून तुझा हात धरण्यास पात्र झालों नाहीं. माझ्या चेहऱ्या-वरील तो काळिमा मी माझ्या हातानें दूर केला खरा, पण माझ्या अब्रूला लागलेला डाग अजून दूर झाला नाहीं, आणि तसें होईपर्यंत तुझ्या या निर्मल हृदयाला माझ्या हृदयांतील कलंकाशेजारीं कसें नेऊं ? पद्मावती, ज्या हकीमानें तुझ्या दादाचा ताप बरा केला, त्याच हकीमाच्या सहाय्यानें उदईक माझ्या अब्रूला लागलेला डाग धुवून निघायचा आहे; तो निघाल्या-नंतर प्रतापसिंहाच्या संमतीनें उघडपणें मीं तुझें पाणिग्रहण करीन.

**पद्मा०:**—हा हकीम तर मग आपल्या या कामासाठीं आमच्या छाव-णींत आला आहे म्हणायचा ?

**प्रेम०:**—होय, आणि तहाची वाटाघाट करण्यालाहि शहानें त्याला पाठविलें आहे. मी येथून गेल्यानंतर या हकीमानें मोठ्या मानमरातबानें आपल्या जवळ मला ठेवून घेतलें, आणि पद्मावतीचें तुझ्यावरचें प्रेम जर कायम असेल तर शहाजवळ स्वत:ची भीड खर्चून राजकन्येला मागणी घालण्याचा शहाचा बेत रद्द करण्याचें त्यानें मला वचन दिलें. तुझें प्रेम कायम टिकलें आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितांच मी तें पत्र घेऊन आलों.

**पद्मा०:**—मी त्या दिवशीं परीक्षेला उतरलें नाहीं, पण आतां तरी कसोटीला पुरी उतरलें ना ?

**प्रेम०:**—हो, पुरी उतरलीस. पण तुझ्याप्रमाणें मी कोठें निष्कलंक झालों आहें? उद्यांच्या दरबारांत मी निष्कलंक ठरेपर्यंत हा तोंडावरचा काळा पडदा माझ्या तोंडावर असाच राहणार. आणि पद्मावती, असलें काळें तोंड तुला अधिक वेळ दाखविणें इष्ट नसल्यामुळें तुझें दर्शनसुख सोडून एक दिवसभर मला आतां दूर होऊं दे. [ जातो.

**पद्मा०:**—उद्यां आपण निष्कलंक ठरल्यावर मी माझ्या हातांनींच आपल्या चेहऱ्यावरील काळा पडदा दूर करीन, आणि आपण कसोटीस पुरे उतरलां याची इषारत माझ्या ओंठांनीं आपल्या ओंठांना देईन.

[ जाते.

---

## प्रवेश तिसरा.

---

स्थळ—प्रतापसिंहाचा दरबार.

(मध्यावर गरुडध्वज व प्रतापसिंह; एका बाजूला अमरनाथ व हकीम; त्यांच्या मागें शिद्दी; एका बाजूस बुद्धिसिंग व इतर सरदार; खिडक्यांतून राणी, पद्मावती वगैरे; असा देखावा.)

**अम०:**—गरुडध्वज, बुद्धिसिंग, प्रतापसिंह, तुम्हीं आपआपसांत भांडावें आणि एकमेकांपासून दूर राहून धर्मयुद्धाचें कार्य शिथिल पाडावें, हें तुम्हां रजपुतांना शोभत नाहीं. मला काळजी वाटत होती, या तहाच्या वाटाघाटीला तरी तुम्ही सर्वजण एका ठिकाणीं जुळतां कीं नाहीं. आमचें प्रयागतीर्थ कांहीं अटीवर सोडून देण्यास अकबरशहा तयार आहे, हें कळविण्याकरितां व त्या अटींची वाटाघाट करण्याकरितां हकीमसाहेब आले असतांनाहि जर तुमचीं चार तोंडें चार दिशांकडे वळून राहिलीं असतीं, तर या युद्धाचा शेवट गोड होण्याची आतांसारखीं चिन्हें दिसणेंच शक्य

झालें नसतें. तेव्हां म्हणतों, गरुडध्वज, आपण या वेळीं येथें आलां हे सर्व हिंदुमात्रावर उपकार आहेत.

गरु०:—शहाशीं तह करायला मी पहिल्या पासूनच तयार आहें. माझी कोणचीच ना नाहीं. गंगायमुनाकांठच्या सर्व प्रदेशावर अकबरशहानें खुशाल राज्य करावें आणि प्रयाग तीर्थ मजकडे सोडून द्यावें, हेंच माझें पहिल्या पासून म्हणणें. साधु महाराज, मला हा तंटा मुळींच नको आहे. हे प्रताप-सिंहजी व हे बुद्धिसिंगजी, दोघेच काय ते तंट्याला कारण. शहाच्या मनांतून पद्मावतीशीं लग्न करायचें आहे आणि बुद्धिसिंगजींच्या मनांतहि तेंच, शिवाय प्रतापसिंहजींना आपली बहीण शहाला द्यायला नको. तेव्हां साधुमहाराज मी म्हणतों, या दोघांची तुम्हीं समजूत घाला, म्हणजे तह झालाच म्हणून समजा.

हकी०:—पद्मावतीबद्दल शहानें घातलेली मागणी सोडून द्यायला शहा तयार आहे.

बुद्धि०:—मग तहाची वाटाघाट कसली शिल्लक राहिली?

हकी०:—वाटाघाटीचे दोन मुख्य मुद्दे आहेत. गंगायमुना कांठच्या कोठच्या प्रदेशावर शहाचा अम्मल रजपुतांनीं कबूल करायचा, हा वाटाघाटीचा पहिला मुद्दा असून, शहाचें दुसरें असें म्हणणें आहे कीं प्रतापसिंहानें पद्मावतीला शहा सांगेल त्या रजपूत सरदाराला दिली पाहिजे.

प्रता०:—माझ्या निशाणाच्या बेअब्रूशीं संबंध असणाऱ्या कोणाहि रजपुताला मी आपली बहीण देणार नाहीं.

बुद्धि०:—हकीम साहेब, तुमचा प्रेमध्वजाकडे ओढा आहे हें खरें, पण उदेपूरच्या निशाणाचे झालेले ते तुकडे जोंपर्यंत राणाजी विसरले नाहींत, तोंपर्यंत या कामीं प्रेमध्वजाचें नांवहि तुम्हीं असें लांबून सुचविणें बरोबर होणार नाहीं.

हकी०:—राणाजी, शहाचें तर असें निक्षून म्हणणें आहे, तुम्हीं

प्रेमध्वजालाच आपली बहीण दिली पाहिजे. तरच तहाची वाटाघाट पुढें चालेल.

बुद्धि०:—असें जर असेल तर आम्हांला या दरबारांत बसून काय करायचें आहे? चला, गरुडध्वज चला. या हकीमाच्या मार्फत राणाजींना खुशाल तह करूं दे. मुसलमानांना आंतून मदत करून उदेपूरच्या निशाणाचे तुकडे तुकडे करणारालाच आपली बहीण देऊन तहाचें बोलणें महाराण्यानें लावलें, याहून आणखी उदेपूरची अपकीर्ति ती कोणची? चला, गरुडध्वज चला. या दरबारांत आम्ही बसूं इच्छित नाहीं. [ जाऊं लागतो.

हकी०:—बुद्धिसिंग, मी तुम्हांला असें जाऊं देणार नाहीं. उदेपूरच्या निशाणाचे चोराप्रमाणें लपूनछपून तुकडे करणाऱ्याला मी असा कसा जाऊं देईन?

बुद्धि०:—हकीमसाहेब कोणाला चोर म्हणतां? तोंड आटपून बोला.

हकी०:—बुद्धिसिंग, या हकीमाचा शब्द नीट ऐका. निशाणाचे तुकडे तुकडे करून राणाजींच्या अब्रूची तुम्ही चोरी करीत असतांना, 'प्रेमध्वज, प्रेमध्वज,' असे शब्द तुमच्या कानीं पडले होते—तुमचा चेहरा सांगतो आहे, तुम्हांला ही खूण पटली! तुमच्या नीच कृत्याकडे कोणी पहात नाहीं असें त्यावेळीं तुम्हांला वाटलें होतें, पण त्या वेळीं परमेश्वरानें मला साक्षीदार म्हणून त्या ठिकाणीं उभें केलें.

बुद्धि०:—तुम्ही एकाला पाहून दुसऱ्यावर चोरीचा आरोप करीत आहां झालें.

हकी०:—नाहीं, बुद्धिसिंग तसें नाहीं; मी तुम्हांला चांगला ओळखतों. हकीमाच्या वेषांत तुमची आमची जानपछान झाली आहे, इतकेंच नव्हे तर पूर्वींहि या साधूजींच्या जंगलांत तुमची भेट होऊन (हकीमाचा वेष टाकून देतो.) या अमिराची व तुमची पक्की ओळख झाली आहे.

**बुद्धि० व प्रेम०:**—काय हकीम आणि अमीर एकच !

**हकी०:**—हकीम आणि अमीर एकच. बुद्धिसिंगजी, तुमच्या चेहऱ्याचीच त्या वेळीं मला ओळख झाली असें नव्हे, तर तुमच्या मनाच्या नीचपणाचीहि मला त्या वेळीं चांगली ओळख पटली. प्रतापसिंहजी, अमीर आणि हकीम एकच, इतकेंच नव्हे तर ज्याच्याशीं तह करण्याकरितां तुम्ही जमलां आहांत तोच मी अकबरशहा. [ अमीराचा वेष टाकून देतो.

**सर्व०:**—काय, अकबरशहा आणि हकीम एकच !

**अम०:**—हो एकच.

**अक०:**—होय, एकच. राणाजी, अकबरानें स्वतःच्या डोळयांनीं या बुद्धिसिंगाला उदेपूरच्या निशाणाचे तुकडे हातांत घेऊन जातांना पाहिलें आहे. पद्मावती व प्रेमध्वज यांच्या एकमेकांच्या प्रेमावर बिब्बा घालण्याकरितां यानें तें दुष्ट कृत्य केलें, हें उघड आहे. जा, बुद्धिसिंगजी जा; तुम्ही आतां खुशाल जा. या नीचाच्या दुष्ट कृत्यामुळें प्रेमध्वज तुमच्या मर्जीतून उतरला, एरव्हीं त्याची अब्रू निष्कलंक आहे अशी ग्वाही हा अकबरशहाचा शब्द, राणाजी, या वेळीं आपणाला देत आहे.

**प्रता०:** - हे अकबरशहाचे माझ्यावर मोठे उपकार आहेत, आणि अकबरशहाच्या मागणीमुळेंच नव्हे तर स्वतःच्या इच्छेनें पद्मावती मी प्रेमध्वजाला द्यायला तयार आहें.

**बुद्धि०:**—चला गरुडध्वज, आपल्याला या तहाच्या वाटाघाटीशीं कांहीं कर्तव्य नाहीं; चला, [ जाऊं लागतो.

**प्रेम०:**—जरा थांबा. प्रेमध्वजाच्या तोंडाला लागलेली ही काळोखी ( तोंडावरचा पडदा काढून ) तुम्ही आपण होऊन आपल्या हातानें तोंडाला फासायला तरी तयार व्हा, नाहीं तर माझ्याशीं द्वंद्वयुद्ध तरी करा.

**बुद्धि०:**—राजाशिवाय किंवा राजपुत्राशिवाय इतरांशीं द्वंद्वयुद्ध रजपूत राजे करीत नसतात.

**अम०:**—प्रतापसिंहजी, हा प्रेमध्वज साधारण कुळांतला सरदार नसून जोधपूरचा राजपुत्र संग्रामसिंह होय, हें मी पूर्वीच बुद्धिसिंगाला सांगितलें आहे

**प्रता०:**—काय, प्रेमध्वज आणि संग्रामसिंह एकच !

**प्रेम०:**—होय एकच.

**बुद्धि०:**—(स्वगत) हें मी विसरलोंच होतों. नाहीं तर द्वंद्वयुद्ध टाळ-ण्याला असली सबब पुढें आणिली नसती.

**प्रेम०:**—बुद्धिसिंगजी, जोधपूरचा राजपुत्र तुम्हांला द्वंद्वयुद्धाला हटकीत आहे. राजाचें रक्त जर तुमच्या अंगांत खेळत असेल, आणि निशाणाचे तुकडे तुकडे करणारे जर तुम्हीं नसाल, तर द्वंद्वयुद्ध करण्यास पुढें या. चला, असे पुढें या. द्वंद्वयुद्धाचें दिव्य करून हा बेअब्रूचा कलंक कोणाच्या तोंडाला फासायचा तें ठरवूं या.

( दोघे लढतात. बुद्धिसिंग वार लागून पडतो. पद्मावती व राणी प्रेमध्वजा-वर फुलें उधळतात. )

**गरु०:**—लागला निकाल. नीच कोण हें या द्वंद्वयुद्धांत पक्कें ठरलें. हा काळा पडदा मी पाहिजे तर माझ्या हातांनीं त्याच्या तोंडावर घालतों.

[ तसें करूं लागतो.

**अम०:**—नको; तसें करण्याची जरुरी नाहीं. त्याला मोठी जखम झाली आहे, आणि त्या जखमेवर अपमानाच्या मिठाचें पाणी शिंपडणें तुमच्या मोठेपणास उचित नाहीं.

**अक०:**—होय, जखम तर मोठी खरीच, पण माझ्याजवळच्या दिव्य औषधीमुळें ती तेव्हांच बरी होईल, जा याला कोणी तरी येथून उचलून घेऊन चला. [ नोकर उचलून नेतात.

**प्रता०:**—औषधोपचाराबरोबर जर उदारपणाचें वर्तन आम्हीं या वेळीं याच्याशीं ठेवलें तर शरीराबरोबर याचें मनहि परमेश्वरी कृपेनें साफ झाल्या

वांचून राहणार नाहीं. संग्रामसिंह, माझ्या शरीरांतला रोग या अकबरशहानें बरा केला त्याप्रमाणें तुमच्या कीर्तीचा रोगहि यांनीं बरा केला आहे. तुम्हांला असे निष्कलंक पाहून तुमच्याबद्दलचें माझ्या मनांतील पूर्वीचें प्रेम आतां द्विगुणित होत आहे.—ये, पद्मावती ये; (पद्मावती, राणी, दासी वगैरे येतात.) साधुमहाराज, आपल्या अमृततुल्य वाणीमुळें आणि अकबरशहाच्या औदार्यामुळें जोधपूरचे युवराज आणि (पद्मावतीचा हात प्रेमध्वजाचे हातांत देऊन,) उदेपूरचे जामात यांची आज मला भेट होत आहे. या उपकाराची फेड मी कशी करूं हेंच मला समजत नाहीं.

**अम०:**—अकबरशहा, राणाजी, गरुडध्वज, व सर्व रजपूत राजे हो, धार्मिक बाबीसंबंधानें तंटयाचें मूळ अकबरशहानें दूर केलें आहे. राजकीय सत्तेच्या विस्तारासंबंधानें मतभेद होण्याचा संभव आहे. पण रोगाची सांथ रजपूत छावणींत पसरली असतां राणाजींना औषध देऊन आणि प्रेमध्वजाकरितां पद्मावतीसंबंधाची अट काढून घेऊन जो उदारपणा अकबरशहानें दाखविला, त्याकडे आपण दुर्लक्ष करणार नाहीं अशी मला खात्री आहे. तेव्हां मी म्हणतों, आपण सर्वांनीं माझ्या देवीच्या मंदिराकडे उदईक चलावें. तेथें प्रेमध्वज व पद्मावती यांचा विवाह मोठ्या समारंभानें करूं. तसल्या मंगलसमयीं साहजिकपणें प्रफुल्लित झालेल्या मनानें तहाच्या इतर अटी आपण ठरवूं; म्हणजे एकाच बैठकींत तह ठरून धर्मयुद्धाचा शेवट गोड होईल.

**शहा व प्रता०:**—अमरनाथजींच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यास आम्ही सर्व तयार आहों. [ पडदा. ]

